# परिचयः

# पुस्तकांचा, चित्रपटांचा व व्यक्तींचा

(परिचयात्मक काही लेख)

**प्रभाकर नानावटी**

# अनुक्रमणिका

# हमारी याद आयेगी!

गीत व संगीत आपल्या जगण्याची अविभाज्य अंगे आहेत. कुठले गाणे का आवडते हे सांगता येत नसले, तरी कुठली ना कुठली गाणी किंवा एखादी धून कुठेतरी मनात पक्की गाठ बांधून बसलेली असते. गाणे आठवले वा त्याचे स्वर कानी पडले की आठवणी उसळून येतात. आपण पुन्हा एकदा त्या काळात हरवून जातो. गाण्यांना संगीत देणाऱ्या संगीतकारांच्या आठवणीत व ही अजरामर गाणी शब्दबद्ध करणाऱ्या गीतकारांच्या सुखदु:खात सहभागी होण्यासाठी, 'गीतयात्री' या पुस्तकाचे लेखक माधव मोहोळकर हे वाचकांना, स्वातंत्र्यपूर्व व स्वातंत्र्योत्तर काळातील एकूण मिळून 30-40 वर्षांच्या कालखंडातील अवीट गोडीच्या हिंदी चित्रपटगीताच्या दुनियेत फिरवून आणतात.



आत्ताच्या चित्रपटातील गाण्यांचे शब्द ऐकल्यानंतर या हिंदी चित्रपट-गीतांना सवंग, छचोर, अर्थहीन, उथळ, असभ्य म्हटल्याशिवाय गत्यंतर नाही असेच वाटते. परंतु माधव मोहोळकरांनी त्याकाळातील चित्रपटगीतांना वाङ्मयीन मूल्य होते व त्यांच्यावर ललित लेखन करता येऊ शकते, हे या पुस्तकाद्वारे सप्रमाण सिद्ध करून दाखविले आहे. विषय तद्दन फिल्मी असला

तरी लेखन वाङ्मयीन दर्जाचे हवे, ह्यावर भर दिल्यामुळे लेखकाने या पुस्तकातील लेखनासाठी घेतलेल्या परिश्रमांना दाद द्यावीशी वाटते.

लेखकानेच म्हटल्याप्रमाणे, अशा लेखनासाठी मोठ्या प्रमाणात संदर्भग्रंथ वा इतर साहित्य हवे. परंतु चित्रपटातील गीत-संगीताची दखल काव्य वा संगीत-समीक्षकांनी कधीच गंभीरपणे घेतली नाही. त्यामुळे संदर्भग्रंथ उपलब्ध असण्याचा प्रश्नच नव्हता. हे लेख लिहिताना मुख्यत्वेकरून लहानपणी ऐकलेल्या गाण्यांच्या आठवणी, मित्राकडचे ग्रामोफोन रेकॉर्ड्स व रेडियोवरील गाणे, यावर लेखकाला विसंबून राहावे लागले. त्याकाळी टेपरेकॉर्डर्स नव्हते. रेडियोसुद्धा फक्त श्रीमंतांकडे होते. तरीसुद्धा, लेखकाने खटाटोप करून दर्दी मित्रांच्या संग्रहातून आठवणींना उजाळा देत आपल्यासमोर चित्रपट गीतांच्या आठवणींचे एक विश्व उभे केले आहे.

मुळात हिंदी चित्रपटगीतांचे ढोबळपणे, लतापूर्व कारकीर्द व लताची कारकीर्द, असे दोन भाग करायला हवेत अशी स्थिती आहे. कारण लताची गाणी येऊ लागल्यानंतर काही तुरळक अपवाद वगळता, चित्रपटाच्या संगीतक्षेत्रात इतर कुठलीही स्त्रीगायिका पाय रोवून उभी राहू शकली नाही, हे मान्य करायला हवे. बेभरवश्याचे हे चित्रपटक्षेत्र कुणाला हात देईल व कुणाला आपटवेल, हे कधीच सांगता येत नाही. ‘आराधना’पूर्वी किशोरकुमार गात होता. परंतु ‘आराधना’नंतरची काही वर्षे त्याच्या गाण्याशिवाय दुसऱ्या कुणाचेही गाणे चित्रपट रसिकांना आवडेनासे झाले. असे का होते, याचे कुठलेही ठोकताळे नाहीत. माधव मोहोळकर मात्र आपल्यासमोर लतापूर्वीचा संगीतकाळ उभा करतात व त्यांच्या दृष्टीने तो हिंदी चित्रपटसंगीताचा सुवर्णकाळ होता.

लेखकाने उभ्या केलेल्या या जमान्यात जगमोहन, ख़ान मस्ताना, जी. एम्. दुराणी, मास्टर निसार, सुरेंद्र, सैगल, तलत महमूद, रफी, किशोर कुमार,

राजकुमारी, नूरजहान, उमादेवी (टुणटुण), गीता दत्त, ज्युथिका रॉय, मुबारक़ बेग़म, बेग़म अख़्तर (अख़्तरी फैज़ाबादी), लता, आशा असे गाण्याच्या जगातील मातब्बर मोहरे आहेत. शैलेंद्र, साहिर लुधियानवी, शकील बदायुनी, राजा मेहदी अली ख़ान, मजाज़, फैज़ अहमद फैज़, सरदार जाफ्री, इ.इ. एकापेक्षा एक असे सरस गीतकार आहेत. तसेच, गीत-संगीतांच्या खाणीतील रत्नांना पैलू पाडणारे नौशाद, खय्याम, शंकर-जयकिशन, सचिन देव बर्मन, अनिल बिश्वास, एन्. दत्ता, रवी, सी. रामचंद्र, कमल दासगुप्ता, सज्जाद हुसेन, हुस्नलाल-भगतराम इत्यादी संगीत रचनाकारही आहेत. एवढा भव्य पट असूनसुद्धा लेखक मात्र यातील निवडक अशा आठ रत्नांभोवती फार सुंदर शब्दचित्र उभे करतात. पारुल घोष, नूरजहान, गीता दत्त व बेग़म अख़्तर या गायिका, तलत महमूद हा गायक, मजाज़, साहिर व शैलेंद्र हे गीतकार, यांच्याभोवतीच्या विश्वातूनच आपल्याला इतरांचा परिचय होतो; त्यांच्या सर्जनशीलतेतील बारकावे उलगडतात.

**बेग़म अख़्तर**:



संगीतकारांची संगीतयोजना, गाणाऱ्यांनी जीव ओतून गायलेली गाणी व या गाण्यांना, चालींना व चित्रीकरण होत असलेल्या दृश्यांना न्याय देणाऱ्या गीतकारांची शब्दरचना, याबद्दलचे वर्णन पुस्तक वाचताना वा पुस्तकात ठिकठिकाणी उल्लेख केलेली गाणी ऐकताना, हे सर्व किती थोर होते हे आपल्या लक्षात येते. **अफसाना लिख रही हूँ**, दिले बेक़रार का... अशी गाणारी उमादेवी, **ये रात फिर न आयेगी**, जवानी बीत जायेगी.. म्हणणारी राजकुमारी, **रोऊँ मैं सागर किनारे** वा **प्रीतम आन मिलो**.. अशी आर्त साद घालणारा सी. एच्. आत्मा, सैगलचा हुबेहूब आवाज काढणारा चंद्रू आत्मा,

इत्यादी गायक-गायिकांबद्दल लेखक भारावून लिहितात. **ऐ मोहब्बत, तेरे अंजाम पे रोना आया**... ही गझल गाणाऱ्या अख़्तरी फैज़ाबादी (बेग़म अख़्तर) ह्यांबद्दलचा लेख वाचताना आपण भान विसरतो. लेख म्हणजे केवळ गाण्यांची जंत्री नसून तिने जगलेला तो काळ, तिच्या आयुष्यातील चढउतार, तिची गझलगायकी, तिची ठुमरी, दादरा, चैती, कजरी वगैरे गायनप्रकार सादर करताना दिसणारी प्रतिभा ही आपल्या सदैव लक्षात राहते.

**मजाज़**:



तलत महमूदने गायलेल्या मजाज़ यांच्या **ऐ ग़म-ए-दिल क्या करूँ, ऐ वहशत-ए-दिल क्या करूँ**.. . या गाण्यामुळे लेखक मजाज़च्या कवितांच्या प्रेमात पडले. प्रेमामध्ये ज्यांच्या वाट्याला फक्त दु:खच आले, अश्या अगणित कवींपैकी मजाज़ही एक होता. तो मुळातच भावनाप्रधान कवी होता. एक काळ असा होता, की अलीगढ़च्या गर्ल्स् कॉलेजच्या मुली चिठ्ठ्या टाकून, मजाज़ कुणाच्या वाटेला येतो ते पाहायच्या; त्याच्या कविता उश्यांखाली ठेवून आसवांनी उश्या भिजवायच्या. मजाज़च्या कवितेत पुरोगामी विचार होते. परंतु त्यात प्रचारकी थाट नव्हता. ती एक वैयक्तिक अनुभूती होती. मजाज़चा प्रेमभंग झाला. त्याचा मानसिक तोल ढळल्यामुळे तो दारूच्या नशेत बुडाला. त्याला दोनदा वेडाचा झटका आला व त्यातच त्याचा अंत झाला.

**पारुल घोष**:



**हमको हैं प्यारी हमारी गलियाँ...हमारी गलियाँ**... असे स्वप्नाळू आवाजात गाणारी पारुल घोष ही बासरीवादक पन्नालाल घोष यांची पत्नी आणि

संगीतकार अनिल बिश्वासची धाकटी बहीण. हिच्या गाण्यावर फिदा झालेल्या लताला पार्श्वगायन काय असते ते समजले आणि मग पारुल तिची आवडती गायिका बनली. लता स्वत: पारुलच्या ऋणाचा उल्लेख करायला कधी विसरली नाही. त्या काळात गाणी मुद्दाम लोकप्रिय करण्याची प्रथा नव्हती. कानावर सतत आदळली म्हणून लोकप्रिय झाली, असे म्हणण्याची सोय नव्हती. जी गाणी मनात रेंगाळत होती ती त्यांच्यातील अंगभूत गुणामुळे. म्हणूनच आजही पारुलची गाणी मनाला चटका लावू शकतात. नंतरच्या काळात लताचा स्वर उमटत राहिला नि बाकीचे आवाज हळूहळू विरून गेले; त्याचप्रमाणे पारुलचा आवाजही!

**तलत महमूद**:



सुरुवातीच्या काळात तलत महमूद पार्श्वगायक म्हणून नव्हे तर गायक म्हणून प्रसिद्धीच्या झोतात होता. त्याला त्या काळी प्रतिसैगल म्हणूनच ओळखत होते. तलत अगदी लहानपणापासूनच सैगलचा वेडा होता. लखनौतील सनातनी वृत्तीच्या त्याच्या वडिलांना तलतचे हे गाण्याचे वेड बिलकुल पसंत नव्हते. तलत मात्र सैगलची गाणी, गझला पाठ करायचा व हुबेहूब सैगलप्रमाणे गायचा. मुकेश, रफीच्या सुरुवातीच्या जमान्यातील हा तलत स्वत:च्या चाहत्यांचा एक वर्ग निर्माण करू शकला. मुळात तलत हा एक गझल गायक होता. गझल व गीत ही दोन्ही भावगीतेच व तलत हा भावपूर्ण आवाजात गाणारा गायक. गझल गाताना कवीच्या मूळ शब्दांची संगत तो कधीच सोडत नसे. तेथे तडजोड नव्हती. आपल्या येथील जगजितसिंग, राजेंद्र मेहता ह्या गझल गायकांनी पाकिस्तानी गझलगायक मेहदी हसनची शैली उचलली आहे. याच मेहदी

हसनला 'पाकिस्तानचा तलत महमूद' म्हणून ओळखायचे. तलतचा आवाज हा मुळातच निर्मळ प्रीतीचा आवाज होता. वासनेचा लवलेशही त्यात दिसत नसे. तलतच्या गाण्यामध्ये मधुरतेबरोबरच शोकात्मतेचाही सूर होता. काही संगीतकारांनी त्याच्यातील मधुरतेला झुकते माप दिले, तर काहींनी शोकात्मतेला. शंकर-जयकिशन, सचिन देव बर्मन, अनिल बिश्वास, या संगीतकारांनी तलतला लोकप्रियतेच्या शिखरावर नेऊन बसविले व सामान्य लोकांना त्याची गाणी गुणगुणायला लावली. लेखकाची तलतची ही यादगार आपल्या मनाला भुरळ पाडते.

**शैलेंद्र**:



लेखकाचे शैलेंद्रशी मैत्रीचे संबंध होते. गाणी, गझल व कवितांच्या आवडीमुळे दोघेही समानधर्मी. गाण्याचे दर्दी. खरे पाहता लेखकाला चित्रपटगीतावर लेख लिहिण्यास शैलेंद्रनेच प्रोत्साहित केले. शैलेंद्रच्या मृत्यूनंतर 'मौज'च्या राम पटवर्धनांशी गप्पा मारताना शैलेंद्रविषयीच्या लेखाची कल्पना लेखकाला सुचली व नंतर तो लेख सत्यकथेच्या अंकात छापून आला. अशाच प्रकारच्या लेखांचा संग्रह, म्हणजेच 'गीतयात्री' हे पुस्तक.

शैलेंद्रने लिहिलेल्या व मुकेशने गायलेल्या पतली कमर है, तिरछी नजर है... या धुंद आणि बेहोशी आणणाऱ्या स्वरांशी लेखकाचा परिचय शाळा शिकतानाच झाला होता, व शैलेंद्रच्या शब्दांची मोहिनी मोठेपणीसुद्धा ओसरली नव्हती. 'टाळयांसाठी लिहिणारा कवी', असा शैलेंद्र नव्हता. शैलेंद्रमध्ये कवी व गीतकार यांचा सुरेख संगम होता. त्याच्या बोलण्यात कमालीचा गोडवा होता. नम्रता होती व त्याचबरोबर दांडगा आत्मविश्वास होता. त्याने कधी उडवाउडवी केली नाही. लपवाछपवी केली नाही. अहंकार

नाही. परळच्या रेल्वेच्या क्वार्टर्समध्ये असताना, कारखान्यात काम करत असताना शैलेंद्रने गरिबी, दारिद्र्य काय असते याचे निरीक्षण केले होते. शैलेंद्र ट्रेड युनियनची कामे करायचा. घरदार नसलेले, फूटपाथवर झोपणारे, तेथेच संसार करणारे, दिवसरात्र भटकणारे, मिळेल ते काम करणारे, नाही मिळाल्यास उपाशी राहणारे, चोरीमारी करणारे अश्या शेकडो लोकांना त्याने त्या काळात पाहिले असेल. आपण कवी आहोत, ह्यापेक्षा आपण सामान्य मनुष्य आहोत ह्यावर त्याचा कटाक्ष होता. मुळात तो सामान्य जनतेचा कवी होता. म्हणूनच पैशासाठी लिहिणाऱ्या कवीप्रमाणे त्याला सुरुवातीला चित्रपटक्षेत्रात जावेसे वाटले नाही. परंतु परिस्थितीने त्याला गीतकार बनविले. राजकपूरने त्याला चित्रपटसृष्टीत आणले व 'बरसात'पासून 'मेरा नाम जोकर'पर्यंतच्या राजकपूरच्या चित्रपटांसाठी प्रत्येक वेळी त्याच्याकडून थीम साँग्स्, शीर्षक गीते व इतर गाणी लिहून घेतली.

एके काळी चित्रपटगीत म्हणजे प्यार, मोहब्बत, बलम, सनम, दिल के टुकडे, इत्यादी पाच-पंचवीस ठराविक शब्दांचा खेळ अशीच समजूत होती. (व आताही तशीच आहे!) परंतु शैलेंद्रने चित्रपटांसाठी आशयगर्भ गीते लिहून हा गैरसमज दूर केला. चित्रपटगीतांना कलेच्या उंचीवर नेऊन बसविले. अशा प्रकारच्या कित्येक गाण्यांचा उल्लेख मोहोळकरांनी लेखात केला आहे, जी मुळातच वाचायला हवीत. परंतु लेखकाचा हा मित्र मध्येच जग सोडून जातो. म्हणूनच हमसफर, एक दिन बिछड़ना ही था... असे लेखकाला म्हणावेसे वाटले.



**नूरजहान**:

संगीतकार सज्जाद हुसेन यांनी संगीत दिलेल्या 'दोस्त' या चित्रपटातील बदनाम

**मोहब्बत कौन करे**... और इश्क़ को रुसवा कौन करे.. हे गाणे गाणाऱ्या नूरजहानने एक काळ गाजवला होता. ती अभिनेत्री होती. परंतु ती गायिका म्हणूनच चित्रपटशौकीनांच्या लक्षात जास्त राहिली. अजूनही ‘अनमोल घड़ी’ वा ‘रतन’मधील तिने गायलेली गाणी आवडत असलेले शौकीन हयात आहेत. नूरजहान स्वातंत्र्यानंतर पाकिस्तानात गेली व तिच्या गायनाला अवकळा आली. आयुष्यात भरपूर चढउतार आले. मध्यंतरी एकदा ती कुठल्यातरी कार्यक्रमासाठी मुंबईला आली. लताने तिचा सत्कार केला. नंतर ती कायमची काळाच्या पडद्याआड गेली.

**साहिर**:



माधव मोहोळकरांनी तलत, शैलेंद्रवरील लेखात उल्लेख केल्याप्रमाणे साहिर लुधियानवी या गीतकाराचीसुद्धा ‘अश्कों में जो पाया है वो गीतों में दिया है..’ या लेखात भरभरून कौतुक केले आहे. साहिरनेसुद्धा कवी व गीतकार म्हणूनच चित्रपट क्षेत्रात प्रवेश केला होता. तो काळही हिंदी, उर्दूच्या आकर्षणाचा काळ होता. उर्दूतील अनेक श्रेष्ठ कवी चित्रपटात यशस्वी ठरले नाहीत. अपवाद फक्त साहिर व शकील बदायुनींचा असावा. साहिर एक निश्चित दृष्टिकोन आणि विचारप्रणाली सोबत घेऊन आला होता, तरीसुद्धा तो लोकप्रिय गीतकार झाला.

गर्भश्रीमंत, खानदानी, वतनदाराचा मुलगा असूनसुद्धा घराण्यातले ऐषआरामी जीवन सोडून गरिबी त्याने आपल्यावर ओढून घेतली होती. जहागीरदार बापाला, आपला मुलगा सामान्य लोकांसारखा शाळा-कॉलेजात जाण्याचा हट्ट करतो, हे सहन झाले नाही. साहिर घरातून बाहेर पडला.

जीवनसंघर्षाला सामोरा गेला. त्यामुळे तो अकाली प्रौढ झाला. केव्हातरी याच काळात प्रेमभंग झाला. उत्कट भावनापूर्ण शायरीतून तो प्रेम व्यक्त करत राहिला. विद्यार्थ्यांच्या आंदोलनात भाग घेतल्यामुळे सरकारी कॉलेजमधून त्याला काढून टाकण्यात आले. लाहोरच्या रस्त्यावर भणंगावस्थेत तो फिरायचा. स्वत: लिहिलेल्या कवितांचे बाड घेऊन प्रकाशकांचे उंबरे झिजवायचा. शेवटी त्याच्या काही कविता दिल्लीच्या मासिकात छापल्या गेल्या. कवितासंग्रह छापला गेला. रातोरात तरुणांचा तो आवडता कवी झाला. स्वातंत्र्यानंतर सचिन देव बर्मन यांनी ‘बाज़ी’ चित्रपटासाठी गीतकार म्हणून त्याची शिफारस केली, त्यानंतर त्याचे भाग्य खुलले.

हा कवी चित्रपटातील गीतांमधून पुरोगामी आशय द्यायचा. प्रेमगीतातूनही ही भावना डोकावत होती. पुरोगामी विचार प्रकट करणारी साहिरची चित्रपटातील गीते कविता वाटायच्या. अनेक वेळा ती निवेदनपर वाटत. सचिन देव बर्मन व साहिर ह्यांची जोडी त्याकाळी भरपूर गाजली. बी. आर. चोप्रांच्या चित्रपटात साहिरला मानाचे स्थान होते. "चोप्राजी आपले संगीतकार बदलतात, पण साहिरऐवजी दुसरा गीतकार घेत नाहीत", इति शैलेंद्र. अनेक कवी व साहित्यिक चित्रपट क्षेत्रात आले व गेले. त्यांच्या काही कवितांना चाली लावल्या गेल्या व त्या लोकप्रियही ठरल्या. परंतु साहिरच्या बऱ्याच कविता चित्रपटांत गायल्या गेल्या. असे भाग्य फारच कमी कवींना मिळाले असेल. ‘प्यासा’ चित्रपटातील हीरो - कवी विजय - ह्याच्या जीवनातील घटना ह्या साहीरच्या जीवनातील घटना असाव्यात, असेच लेखकाला वाटते. ‘प्यासा’ ही कवीच्या मनाची व जीवनाची कथा होती. माधव मोहोळकरांनी या संवेदनशील गीतकाराबद्दल लिहून त्याला अजरामर केले आहे.

**गीता दत्त**:

**मेरा सुंदर सपना बीत गया**... असे गाणारी गीता दत्तसुद्धा, शैलेंद्र, तलत व साहिर यांच्याप्रमाणे लेखकाचा वीक पॉइंट होता की काय, असे तिच्यावरचा लेख वाचताना वाटू लागते. लताला मिळालेले मानसन्मान तिच्या वाट्याला आले नाहीत. तरीही, तीसुद्धा एक प्रथितयश गायि का होती. भक्तीगीत, विरहगीत, लाडिक प्रेमगीत वा कुठल्याही गीताचा प्रकार असो, गीता दत्त



अत्यंत तन्मयतेने गायची. गीताच्या आवाजात नशा होती, मादकता होती पण उथळपणा नव्हता. आशा भोसलेचे आगमन होईपर्यंत ओ. पी. नैयरची उद्दीपक गीते, गीता दत्तच्या नशील्या आवाजात ऐकायला यायची. लेखकाने गीता दत्तच्या आवाजाच्या अजून एका वैशिष्ट्याचा उल्लेख केला आहे. पुरुष गायकांनी गायिलेली गाणी पुन्हा एकदा गीता दत्तने म्हटली तरी ती गायकांपुढे फिकी पडली नाही. सी. एच्. आत्माने गायलेले **प्रीतम आन मिलो**.. . पुढे गीताने गायलेले हेच गीत कुणाला विसरता आले नाही. **न ये चाँद होगा न तारे रहेंगे**. . हे हेमंतकुमारने अप्रतिम गायलेले गीत असूनही गीता दत्तचे स्वर झपाटून टाकतात. त्या तुलनेने लता-आशा हरल्या, असे म्हणावे लागेल. लताच्या **जीवन के सफर मे राही** मिलते है बिछड़ जाने को..पेक्षा **किशोरचे** तेच गीत अधिक लोकप्रिय झाले. लताच्या ‘जायें तो जायें कहाँ..’पेक्षा **तलतचे** ‘जायें तो जायें कहाँ..’ लोकांनी अधिक पसंत केले. आशाच्या **ए ग़मे दिल क्या करूँ**...पेक्षा तलतचे हेच गाणे अधिक लोकप्रिय ठरले.

परंतु या गायिकेचीसुद्धा जीवनकहाणी शोकांतिका ठरली. गुरु दत्तबरोबर लग्न झाले. तिच्या गाण्यावर बंदी आली. एका निसटत्या क्षणी गुरू दत्तने

आत्महत्या केली व गीता दत्तचे जीवन संपूर्ण उध्वस्त झाले. वयाच्या 41व्या वर्षी तिला मृत्यूने गाठले.

हे पुस्तक वाचताना, जुन्या जमान्यातील गीत-संगीताच्या ह्या आठवणींनी भावनावश झालेल्या लेखकाप्रमाणे, त्याने जाग्या केलेल्या स्मृतींनी आपणही नकळत हळवे होतो. मोहोळकरांचे गीतयात्री वाचल्यानंतर, त्यात त्यांनी उल्लेख केलेली (शेकडो) गाणी नेटवर ऐकताना आपला आनंद गहिरा होतो ह्यातच पुस्तकाचे व लेखकाचे यश दडले आहे. एखाद्या सर्जनशील चित्रपटसंगीत-रसिकाने ह्या पुस्तकातील आशय, उल्लेख केलेली गाणी, गीतकार, संगीतकार इत्यादींचे दृक्-श्राव्य विश्व मल्टिमिडीयाद्वारे उभे केल्यास, आमच्यासारखे रसिक नक्कीच चिरऋणी राहतील.

**गीतयात्री**

*माधव मोहोळकर,*

मौज प्रकाशन गृह (१९८७)

किं - ५३ रु, पृ.सं - १७६



# दि अल्टिमेट गिफ्ट

Self help या आजकालच्या तरुणांच्या जिव्हाळयाच्या विषयावर लिहिलेल्या पुस्तकांच्या ढिगाऱ्यातून खरोखरच एखादे तरी वाचनीय पुस्तक मिळू शकेल याबद्दल शंका असतानाच **जिम स्टोव्हाल** या लेखकाचे *दि अल्टिमेट गिफ्ट* हे पुस्तक हाती लागले. सोप्या व मोजक्या शब्दात आपली जडण घडण कशी असावी, आपली जीवनशैली कशी असावी, कुठल्या जीवनमूल्यांना अग्रक्रम द्यावीत, इत्यादी अनेक पैलूवर या पुस्तकात फार सुंदर मांडणी केलेली आहे. कुठलेही शब्दालंकार नाहीत, साहित्यिक टीका टिप्पणी नाही, संदर्भबंबाळपणा नाही, वस्तुपाठ म्हणून इतरांचा उल्लेख नाही. जे काही सांगायचे आहे ते कुठलाही आडपडदा न ठेवता सांगितल्यामुळे पुस्तक अत्यंत वाचनीय झाले आहे. हौवर्ड 'रेड' स्टिव्हेन्स या 80 वर्षाच्या वृद्ध श्रीमंताच्या मृत्युपत्राचा संदर्भ घेत जिम स्टोव्हाल यांनी तरुण पिढीला काही जीवनमूल्यांच्या संदर्भात सांगण्याचा प्रयत्न या पुस्तकातून केला आहे.




'रेड' स्टिव्हेन्स यानी स्वकष्टाने तेल व जनावरांच्या व्यापार व्यवहारातून गडगंज संपत्ती कमावली आहे. श्रम व पैशाची जाणीव असल्यामुळे तो त्याच्या आयुष्यभरात गरीबांसाठी, वंचितांसाठी त्याच्या ट्रस्टतर्फे

ठिकठिकाणी काही उपक्रम राबवत होता. त्याच्या मृत्युनंतर त्यात खंड न पडता ते काम पुढे चालू रहावे या उद्देशाने हा कारभार त्याचा 23 वर्षाचा पुतण्या, जेसनच्या हाती सोपवण्याआधी तो या कामासाठी योग्य आहे की नाही याचा त्याला शोध घ्यावयाचा होता. मृत्युपूर्वी जे जमू शकले नाही ते आता मृत्युनंतर करण्यासाठी त्याने मृत्युपत्रात काही अटी घातल्या होत्या. मृत्युपत्राची अंमलबजावणीची जबाबदारी त्याच्या तरुणपणातील जिवलग मित्र व त्याच्या कंपनीतील एक भागिदार, हॅमिल्टनवर सोपवलेली होती.

स्टिव्हेन्सच्या मृत्युनंतर हॅमिल्टन यानी मृत्युपत्रात उल्लेख केलेल्या स्टिव्हेन्सच्या वारसदारांना बोलावून प्रत्येक वारसदारांना काय काय मिळणार आहे, याची कल्पना देतो. गंमत म्हणजे शेवटपर्यंत जेसनचा त्यात उल्लेख नसल्यामुळे अक्षरश: तो चिडतो. परंतु स्टिव्हेन्स यानी त्याच्यासाठी एक अल्टिमेट गिफ्ट राखून ठेवलेली असते. फक्त ते गिफ्ट मिळवण्यासाठी जेसनला काही अटी पूर्ण करावे लागेल असे हॅमिल्टन सांगतो. श्रीमंतीत वाढलेल्या जेसनला काकानी संपत्ती कशी वाढवली, काय काय कष्ट घेतले याची, इतर कुटुंबियाप्रमाणे, अजिबात कल्पना नव्हती. काकाचे पैसे उडविण्यातच आतापर्यंतचे त्याचे आयुष्य गेले होते. व काकाच्या मृत्युनंतर विनासायास फार मोठे घबाड मिळणार याचीसुद्धा त्याला खात्री होती. परंतु इतर कुटुंबियांपेक्षा 'रेड' स्टिव्हेन्सचा जेसनवर जास्त प्रेम होते. जेसनला एक चांगले आयुष्य जगता यावे याचाही विचार 'रेड' स्टिव्हेन्स यानी केला होता. स्टिव्हेन्सला जेसनमध्ये काही 'स्पार्क' असण्याची शक्यता वाटल्यामुळे त्याच्याकडून भरपूर अपेक्षा होत्या. म्हणूनच मृत्युपत्रात अल्टिमेट गिफ्ट देण्यापूर्वी काही अटींची पूर्तता केली पाहिजे यावर 'रेड' स्टिव्हेन्सचा भर होता.

काकाच्या विक्षिप्तपणावर जेसन तडफडतो, चिडतो. परंतु हॅमिल्टनपुढे त्याचे काही चालत नाही. शेवटी वैतागून त्या अटी तरी काय आहेत हे ऐकण्यासाठी थांबतो. हॅमिल्टनची असिस्टंट, मिस हेस्टिंग्स एक बॉक्स घेऊन येते. त्यात 'रेड' स्टिव्हेन्स यांनी मृत्युपूर्वी रेकॉर्ड केलेले व्हिडिओ कॅसेट्स असतात. त्यातील क्रमांक एकची कॅसेट ती प्ले करते.

'रेड' स्टिव्हेन्स टीव्हीच्या पडद्यावरून रेकॉर्डेड संभाषणाद्वारे जेसनला उद्देशून *पुढील 12 महिन्यात 12 कॅसेट्स दाखवल्या जात असून त्यात उल्लेख केल्याप्रमाणे जेसनला त्या अटी पूर्ण कराव्या लागतील, व त्या अटी पूर्ण केल्यानंतरच अल्टिमेट गिफ्टचा हकदार बनण्याची शक्यता आहे.* असे सांगतो. हवे असल्यास जेसन केव्हाही यातून अंग काढून बाहेर पडू शकतो वा हॅमिल्टनला अटीची पूर्तता झाली नाही असे वाटत असल्यास जेसनला ती गिफ्ट मिळणार नाही, याची कल्पना देतो. जेसनचा सहभागी होण्यास होकार मिळाल्यानंतर मिस हेस्टिंग्स पुढील कॅसेट प्ले करते. त्यात श्रममूल्यासंबंधीच्या सूचना असतात. अशा प्रकारे इतर कॅसेट्समध्ये पैशाचे महत्व, मित्रत्वाचे नाते, ज्ञानाची आस, समस्यांना सामोरे जाणे, कुटुंबसौख्य, हास्य - विनोद यांचे योगदान, निरपेक्ष प्रेमाचे महत्व, वेळेचा सदुपयोग, इत्यादी गोष्टींचे महत्व कळून घेण्यासाठीच्या सूचना असतात. या गोष्टी जेसनला शिकविण्यासाठी त्याला वेगवेगळ्या ठिकाणी पाठविण्याची व्यवस्था 'रेड' स्टिव्हेन्स व हॅमिल्टन यांनी अगोदरच केलेली होती. प्रत्येक अटीच्या पूर्ततेसाठी एक महिन्याचा वेळ दिलेला असतो. महिन्याच्या शेवटी हॅमिल्टनला भेटून काय काय घडले, हे सांगायचे असते.

श्रमाचे मूल्य कळण्यासाठी जेसनला 'रेड' स्टिव्हेन्सचा मित्र, गस् काल्डवेलच्या रँचवर पाठवले जाते. स्वत:चे व इतरांचे सामान उचलण्यापासून रँचच्याभोवती एकट्यानेच खड्डे खणून कुंपण घालण्याचे

त्या महिन्याभऱात करण्याचे काम त्याच्यावर सोपवलेले असते. पहिल्या-पहिल्यांदा काम करण्यास कुरबुर करणारा जेसन शेवटी शेवटी शारीरिक श्रमातून मिळणाऱ्या आनंदाची मजा घेत परत येतो. या कामाचा मोबदला म्हणून गस् काल्डवेल त्याला 1500 डालर्स देतो. आयुष्यातील त्याची स्वश्रमाची ही पहिली कमाई असते. हॅमिल्टनला जेसनचे हे पहिले पाऊल योग्य दिशेने पडत आहे, असे वाटते.

'रेड' स्टिव्हेन्सच्या मते, पैशामुळे जरी माणूस सुखी होत ऩसला तरी पैशाच्या अभावामुळेसुद्धा तो सुखी होत नाही.  पैसा हे फक्त साधन असून त्याचा योग्य रीतीने उपयोग केल्यास आयुष्यात समाधान मिळण्याची शक्यता आहे. जेसन गुलछबू वृत्तीचा असल्यामुळे आतापर्यंतचे आयुष्य (काकाचा) पैसा पाण्यासारखे खर्च करण्यात घालविलेले होते. परंतु श्रमाचे मूल्य कळलेल्या आताच्या जेसनला पुढील महिन्याभरात 1500 डॉलर्सचा विनियोग कठिण परिस्थितीत असलेल्यांच्या स्थितीत बदल घडविण्यासाठी करण्याची अट घालतो व अशा परिस्थितीग्रस्तांचा शोध घेण्यासाठी जेसनला पाठविले जाते. जेसन या पैशाचा विनियोग स्काउट मुलांच्या शेवटच्या क्षणातील अडचणी सोडविण्यासाठी, एका कष्टकरी महिलेची कार जप्त होण्यापासून वाचवण्यासाठी, नोकरी नसल्यामुळे फूड कूपन्सवर गुजराण करत असलेल्या दंपतीच्या मुलांना साताक्लॉजच्या भेटवस्तू घेण्यासाठी आणि एका वृद्ध दांपत्याच्या औषधपाण्यासाठी खर्च करतो.

खऱ्या मैत्रीचे महत्व गस् काल्डवेल आणि 'रेड' स्टिव्हेन्स (व हॅमिल्टन) यांच्या मैत्रीच्या गोष्टी ऐकून त्याला कळते. वाटेत भेटलेल्या ब्राइन या तरुणाच्या सहवासातून निरपेक्ष मैत्रीची कल्पना त्याला येते. ज्ञान संपादनाची आस कशी असते याची कल्पना जेसनला दक्षिण अमेरिकेतील जंगलातील एका खेड्यात महिन्याभराच्या मुक्कामात असताना कळते. तेथे 'रेड'

स्टिव्हेन्सच्या ट्रस्टच्या वतीने एक लायब्ररी चालविले जात असते. पुस्तकांसाठी, स्वत:च्या ज्ञानात भर पडावे म्हणून तेथील गरीब खेडूत किती कष्ट घेतात याची त्याला तेव्हा लक्षात येते. आपण स्वत: कॉलेजच्या शिक्षण काळात किती असभ्यपणाने वागत होतो याची त्याला लाज वाटू लागते.

अशाच प्रकारे वेगवेगळे संदर्भ व प्रसंगातून चांगले आयुष्य जगण्यासाठी अनुभवांची शिदोरी कशी जमवावी लागते याच्या प्रात्यक्षिकांचे वर्णन या पुस्तकात आहे. कौटुंबिक सौख्य म्हणजे नेमके काय असू शकते याचा प्रत्यय एका निराधार बालकांच्या अनाथाश्रमात महिनाभर मुक्काम केल्यानंतर जेसनला येतो. आयुष्यातील आपलेच दु:ख फार मोठे आहे अशी समजूत करून घेतलेल्यानी अवती भोवती काय चालले आहे याचे निरीक्षण केल्यास आपले दु:ख म्हणजे काहीच नाही असे वाटू लागते. समस्यांच्या शोधात असलेल्या जेसनला सात वर्षाच्या मुलीसोबत आलेल्या एका तरुणीची भेट एका बागेत होते. मुलगी कॅन्सरग्रस्त रुग्ण. सर्व वैद्यकीय उपाय थकलेले. हॉस्पैसमध्ये शेवटचे क्षण मोजत असलेली. तरीसुद्धा त्या मुलीची इच्छा पूर्ण करण्यासाठी ही तरुणी धडपडत असते. त्या लहान मुलीला जेसनसुद्धा तिच्याप्रमाणे कॅन्सरग्रस्त रुग्ण आहे असे वाटून त्याचे समाधान करते. जेसनला हा एक नवीन अनुभव होता. कठिण परिस्थितीतसुद्धा विनोद माणसाला बळ देते याचा प्रत्यय डेव्हिड रीस याच्या भेटीत आला.

यातील प्रत्येक 'भेटवस्तू'च्या मागे असलेली गोष्ट वाचत असताना त्याचे महत्व कळू लागते. शेवटी जेसन, हौवर्ड 'रेड' स्टिव्हेन्सच्या सर्व अटींची पूर्तता करून 100 कोटी डॉलर्सची उलाढाल असलेल्या 'रेड' स्टिव्हेन्सच्या ट्रस्टचा कारभार सांभाळतो.

जेमतेम 150 पानाच्या या पुस्तकाचे लेखक, जिम स्टोव्हाल अंध असूनसुद्धा एकेकाळचे वेट लिफ्टिंग स्पर्धेतील ऑलिंपिक चॅंपियन होते.

नरेटिव्ह टेलिव्हिजन नेटवर्क या कंपनीचे ते संचालक असून ही कंपनी अमेरिकेतील 130 लाख अंधव्यक्ती व त्यांचे कुटुंबीय यांच्यासाठी टीव्ही सिरियल्स व चित्रपटांची निर्मिती करत असते. नेटवर्कच्या शोमध्ये कॅथरिन हेपबर्न, जॅक लेमन, कॅरोल चॅनिंग, स्टीव्ह ऍलन, एड्डी अल्बर्ट इत्यादी अमेरिकन सेलिब्रीटीज भाग घेत असतात. जिम स्टोव्हाल यांनी अंधव्यक्ती व इतरांसाठी अनेक पुस्तकं लिहिली आहेत. *दि अल्टिमेट गिफ्ट* पुस्तकाच्या आशयावरून काढलेला चित्रपट व डीव्हीडीची निर्मिती केली आहे.

एक संग्राह्य पुस्तक!

●●●

# मेंदूचे अंतरंग

*मेंदू हे माणसाला पडलेले सगळ्यात अवघड कोडे आहे. या कोड्याचे उत्तर पुन्हा मेंदूतच दडलेले आहे !*
*आपल्याला स्वप्न का पडतात? हरवून जातो? स्मरणरंजनात आपण इतके का हरवतो? सूड घ्यायची इच्छा मनात का निर्माण होते? आपण प्रेमात का पडतो? सगळ्या भावभावना हा जर मेंदूतल्या रसायनांचाच खेळ असला तर मग आपल्या हातात काय असतं? या प्रश्नाची उत्तर शोधायला जितकं खोल जावं तितकं गुंत्यात अधिकच अडकायला होतं!*
*गेल्या दोन तीन वर्षात समोर असलेल्या माहितीच्या आधारांन पण रंजक शैलीत या गुंत्याचे पदर सोडवणारं पुस्तक.*

सुबोध जावडेकर यांनी लिहिलेल्या *मेंदूच्या मनात* या पुस्तकाच्या मागील पानावरील हा परिच्छेद वाचत असताना खरोखरच या प्रश्नांची उत्तर एक-दोन पानात सामावणारे असतील का असा प्रश्न पडू शकतो. तरीही या विषयातील संशोधनाची दिशा काय आहे. हे मात्र निश्चितच समजू शकेल. मुळात हे पुस्तक लेखकांनी एका वृत्तपत्रासाठी लिहिलेल्या सदरांचे एकत्र व संपादित केलेला संग्रह आहे. केवळ वर उल्लेख केलेल्या प्रश्नाचेच लेखकांनी आढाव घेतला नसून सुमारे 25 प्रश्नांचा वेध घेतला आहे.

लबाडी करावी अस प्रामाणिक माणसांच्या मनात का येत नाही? आपल्याला कंटाळा का येतो? बुध्दिमत्ता मेदूच्या आकारावर अवलंबून असते का? सामान्य लोक अंधश्रद्ध का असतात? साध्या साध्या प्रश्नांची उत्तर द्यायला वृद्धांना बराच वेळ का लागतो? बेशुध्द अवस्थेत असलेल्या रूग्णांशी संवाद शक्य आहे का? सोशल नेटवर्किंगवर वेळ घालवल्यामुळे मेंदूवर वाईट परिणाम घेऊ शकतो का? .. अशा चित्रविचित्र परंतु आपल्या मनाशी - वा मेंदूशी - संबधित असलेले प्रश्न उपस्थित करून या विषयीचा

इतिहास त्याबद्दलचे पूर्वग्रह, चुकीच्या कल्पना व या विषयी तज्ञांचे म्हणणे काय आहे, आतापर्यंतचे झालेले संशोधन, प्रश्नातून उत्पन्न होणारे अनेक पदर यावर इत्यंभूत चर्चा करत असतानासुद्धा लेखकाने यात रंजकता आणल्यामुळे लेख एका दमात वाचून होतात. मेंदूची रचना, त्याचे भाग, त्यांची नावं, इत्यादींच्या उल्लेख टाळून लेख लिहिलेले असल्यामुळे उत्कंठा असलेल्या वाचंकाना नवीन माहिती वाचल्याचे समाधान मिळते शिवाय आपल्या पूर्वग्रह दूषित दृष्टिकोनात दुरुस्ती करून लेखकाशी सहमती दाखवावीशी वाटू लागते.




माणसाला पडणाऱ्या स्वप्नांचेच उदाहरण घेतल्यास स्वप्नाबद्दलच्या पूर्वी असलेले कित्येक कल्पना कालबाह्य झाल्या आहेत. रॅपिड आय मूव्हमेंटच्या (REM) वेळी स्वप्न पडतात असे पुर्वी वाटत होते. परंतु REM नसतानाही स्वप्न पडतात. फारच कमी लोकांना रंगीत स्वप्न पडतात अशीही समजूत होती. परंतु 85 टक्के लोकांना रंगीत स्वप्न पडतात. फक्त घोरत असताना स्वप्न पडत नाहीत.

स्वप्नांच्या संशोधनाची सुरुवात दीडशे वर्षापूर्वी झाली व सिग्मंड फ्रॉइड या जर्मन मानसतज्ञाने स्वप्नासंबंधी सिद्धांत मांडण्याचा प्रयत्न केला. पुढील काळात इतर अनेक संशोधकांनी त्यातील चुका शोधून याविषयीच्या संशोधनाला दिशा दिली.

स्वप्न दृष्टांत व स्वप्नात भवितव्य शोधणाऱ्यांची मात्र यामुळे घोर निराशा होत आहे. तर्कसंगत नसलेल्या स्वप्नातून काही तरी (अनुकूल) अर्थ काढून भविष्य वर्तविणे शक्य नाही हे सप्रमाण सिद्ध झाले आहे. स्वप्नात देवी येऊन गणितांची उत्तरं सांगते अशी प्रसिद्ध गणितज्ञ रामानुजम यांची श्रद्धा होती. परंतु अशा प्रकारची सर्जनशील स्वप्न पडणे निव्वळ योगायोगही असू शकतो.

'हुकुमी स्वप्न पडू शकतात का'  हाही प्रश्न या संदर्भात विचारता येईल. स्वत:च्या इच्छेप्रमाणे स्वप्न पाडता येणाऱ्यांची संख्या हजारात एक असू शकेल. अशांना ल्युसिड ड्रीमर्स असे म्हणतात. यांच्यावरही संशोधन चालू आहे. मेंदूत तयार होणारी प्रतिमा संगणकांच्या पडद्यावर कृष्ण धवल स्वरूपात सादर करणारी संगणक प्रणाली विकसित होत आहे. कदाचित या प्रणालीतून आपल्याला स्वप्न का पडतात याचा उलगडा होऊ शकेल असे वैज्ञानिकांना वाटत आहे.

'माणसं शिव्या का देतात' याचा शोध घेताना रागाच्या भरात तोंडात शिवी येणं ही आदिम प्रेरणा आहे, असे लेखकाला वाटते. ती जनावरांतही असते. समोरच्याला भेदरवून सोडण्यासाठी, त्याला नॉन-प्लस करण्यासाठी शिव्यांचा उपयोग होऊ शकतो. शिव्यांचा संबंध आपल्या भावभावनांशी निगडित असतात व अशा प्रकारच्या आदिम भावनांचा आपल्या मेंदूतील लिंबिक सिस्टिमशी जवळचा संबंध असतो, असे तज्ञांचे मत आहे. कुठल्याही शब्दाचा शब्दशः अर्थ आणि भावनेशी निगडित अर्थ असे दोन अर्थ असतात. व त्या मेंदूत वेगवेगळया ठिकाणी साठवल्या जातात. शिव्यामुळे समोरचा माणूस घायाळ होत असला तरी शिव्या देणाऱ्याला याचे काही फायदे होत असतात. मनातील हिंसेच्या उर्मीला वाट मिळते. शिव्या दिल्यानंतर माणूस रिलॅक्स होऊ शकतो. वेदना कमी होतात. परंतु शिवी देणं

व शिवी ऐकून रक्त उसळणं हे नैसर्गिक आहे म्हणून त्याला आवरायचेच नाही, हे लेखकाला पटत माही. विवेकाने ते ताब्यात आणणे शक्य आहे यावर लेखकाचा विश्वास आहे.

अंतःप्रेरणेच्या संदर्भात असलेले वाद - प्रतिवाद, चर्चा व त्याचे आपल्या आयुष्यात असलेल स्थान याबद्दलही लेखक अभ्यासपूर्वक लिहित आहे. या पूर्वी अंतःप्रेरणा ही गोष्ट अवैज्ञानिक अशी समजली जात होती. आता मात्र अंत:प्रेरणेने घेतलेला निर्णय हा आपल्या अबोध मनात साठवलेली माहिती वापरून घेतलेला निर्णय आहे असे मानले जात आहे. *अंतःप्रेरणेवर विश्वास ठेऊन निर्णय घ्या* असे सांगणाऱ्या पुस्तकांची चलती आहे. त्यात थोडे फार सत्य आहे. तरीही विचारपूर्वक घेतलेले निर्णय कचऱ्याच्या टोपलीत टाकून *फक्त तुमचे अंतर्मन काय सांगते तसेच वागा* असे म्हणण्यातही शहाणपणा नाही, असे लेखकाला वाटते.

क्रिकेटपटू, खेळाडू, नट - नट्या व इतर सेलिब्रिटीज यांचा लकी गोष्टीवर भरपूर विश्वास असतो. त्यांच्या काही विशिष्ट लकी गोष्टी असतात. लकी रंग असतात. लकी तारखा, लकी वार, लकी संख्या असतात. व ते नेहमी त्याचे प्रदर्शनही करत असतात. कदाचित अशा गोष्टीमुळे त्यांना काही प्रमाणात दिलासा मिळत असावा. आत्मविश्वास वाढत असावा. परंतु त्यातून खरोखरच त्यांची कामगिरी सुधारते का हा प्रश्न लेखकाला पडलेला दिसतो. अशा प्रकारच्या अंधश्रद्धांच्या बाबतीत झालेल्या संशोधनाचा आढावा घेत असताना आपला मेंदूच अशा गोष्टींची भर घालत असतो हे लक्षात येत आहे. दोन घटना एका मागोमाग घडत असताना दिसल्यास दुसऱ्या घटनेमागील कारणामुळे पहिली घटना घडते अशी समजूत मेंदू करून घेतो. ओढून ताणून हा संबंध जोडणं कितीही मूर्खपणाचे वाटत असले तरी घटनेमागील कारण अजिबात माहित नसण्यापेक्षा हास्यास्पद कारणसुद्धा

चालू शकेल अशी मानसिकता त्यात असते. त्याचा मेंदू स्वीकार करतो व त्यातूनच अंधश्रद्धांचा जन्म होतो. लेख वाचताना लेखकाचा हा निर्णय पटू लागतो. माणसं कर्मकांड करून मनाला दिलासा मिळवू पाहतात, हे खरे असले तरी भोंदूबाबा मेंदूच्या या कमकुवतपणाचा गैर फायदा घेतात व साऱ्या समाजाला उल्लू बनवतात, हेही लक्षात घ्यायला हवे.

पूर्ण पुस्तक वाचताना लेखक मनाचे अंतरंग उघडे ठेवत आहेत व आपल्याला विचार करण्यास भाग पाडत आहेत, हे लक्षात येते. प्रत्येक लेखाच्या शेवटी उल्लेख केलेल्या संदर्भ सूचीवरून लेखकानी हाताळलेल्या विषयांचा आवाका समजतो व आपण थक्क होऊन जातो.

अभ्यासपूर्ण असलेले हे पुस्तक संदर्भ ग्रंथ म्हणून नक्कीच उपयुक्त ठरू शकेल.

**मेंदूच्या मनात**
*सुबोध जावडेकर*
मॅजेस्टिक प्रकाशन, ठाणे,
मूल्यः 200 रु, पाः 152



# भारतातील रॅशनॅलिस्ट चळवळ

एका अभ्यासू रॅशनॅलिस्टच्या मते भारत देश हा फक्त धर्म, श्रद्धा, अंधश्रद्धा, रूढी, परंपरा यांचाच देश नसून नीरिश्वरवाद, विवेकवाद, मानवतावाद, चिकित्सक वृत्ती, अज्ञेयवाद यांचेही अंश कुठे ना कुठे तरी या देशात प्राचीन काळापासून सापडतात. जेव्हा हे मत आपण धसास लावण्याचा प्रयत्न करतो तेव्हा यातील खरेपणाविषयी संशय वाटू लागतो. कारण आपल्या आवती भोवती धर्माच्या अतिरेकामुळे विवेक, मानवता यांना पायदळी तुडवलेली उदाहरणं मोठ्या प्रमाणात सापडतात. परंतु डॉ. जॉन (जोहान्नेस) क्वॅक या एडिनबरो विद्यापीठातील प्राध्यापकाला मात्र आपल्या देशातील हा वेगळेपणा चटकन लक्षात येतो. त्यानी यासंबंधी एक प्रबंधच सादर केला असून त्याच प्रबंधाची पुस्तकी आवृत्ती Disenchanting India या नावाने ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेसने प्रकाशित केली आहे.




त्यांच्या या प्रबंधात प्रामुख्याने भारताच्या रॅशनॅलिस्ट परंपरेचा इतिहास, व आता त्याचे समाजातील स्थान यावर ऊहापोह केला आहे. त्यासाठी

लेखकानी देशभर विखुरलेल्या अनेक रॅशनॅलिस्ट संघटनांना प्रत्यक्ष भेट देऊन माहिती गोळा केली आहे. संघटनेचे उद्दिष्ट, त्यांच्या कार्याचे स्वरूप, त्याचे समाजावर होत असलेले परिणाम इत्यादीवर दृष्टीक्षेप टाकण्याचा प्रयत्न केला आहे. एक संशोधक म्हणून त्यानी घेतलेले श्रम व माहिती गोळा करण्यासाठी घेतलेली चिकाटी अत्यंत प्रशंसनीय ठरेल.

खरे पाहता लेखकाला रॅशनॅलिझमचे प्रत्यक्ष व्यवहारात होत असलेल्या उपयोगासंबंधी उत्सुकता होती. या रॅशनॅलिस्ट संघटना परंपरावादी समाजाचा सामना कशा प्रकारे करतात, रॅशनॅलिस्ट तत्वज्ञान त्यांच्या गळी कशा प्रकारे उतरवतात, त्यामुळे उद्भवलेल्या कठिण प्रसंगाचा सामना कसे करतात, इत्यादीसंबंधी माहिती मिळवण्यात त्याला रुची होती. परंतु आपल्यातील बहुतेक संघटना कागदी घोडे नाचवण्याव्यतिरिक्त फार काही करत नाहीत. अनेक संघटना व्यक्ती केंद्रित असल्यामुळे कार्यकर्त्यांची वणवा असते. आठवड्यातून वा महिन्यातून एखादी बैठक, काही निषेध पत्रकं, एखादं मुद्रित नियतकालिक वा संस्थळावर लांबलचक अशी दुर्बोध माहिती यापुरतेच त्यांचे कार्य सीमित असते. त्यामुळे लेखकाला महाराष्ट्र अंधश्रद्धा निर्मूलन समितीच्या (अंनिसच्या) कार्यावर लक्ष केंद्रित करावेसे वाटले. अंनिसचे उद्दिष्ट, त्याची कार्य पद्धती, धोरणं, त्यांच्या कार्यकर्त्यांची नैतिक बैठक, लेखकाला आवडल्यामुळे त्याचा प्रबंधाचा मोठा हिस्सा अंनिसच्या संबंधी आहे. यासाठी लेखक अंनिसच्या कार्यकर्त्यांबरोबर राहून, खेड्यापाड्यात हिंडून, त्याच्या वरिष्ठ व इतर कार्यकर्त्यांशी चर्चा करून अंनिसला समजून घेण्याचा प्रयत्न केला आहे. त्यामुळे एका अर्थाने हा प्रबंध अंनिसच्या वाटचालीचा लेखाजोखा आहे म्हणण्यास भरपूर वाव आहे.

या पुस्तकात केवळ अंनिससंबंधीच माहिती नसून भारतातील बुद्धीप्रामाण्यवादी, इहवादी, निरीश्वरवादी, मानवतावादी, अज्ञेयवादी व

मुक्तविचार करणाऱ्या या क्षेत्रातील बहुतेक विचारवंतांच्या व त्यांच्या संघटनाबद्दल विमर्शात्मकपणे केलेली माहिती आहे. आताची रॅशनॅलिस्ट चळवळ मुख्यत्वेकरून जनमनसातील अंधश्रद्धांना आव्हान देत आहे. त्याचबरोबर अलौकिक शक्तीचा दावा करणाऱ्या व अविवेकी विचारांचा प्रचार - प्रसार करणाऱ्या बुवा - बाबांच्यावर आगपाखड करणारी आहे. या प्रकारच्या चमत्कार वा अतींद्रिय शक्तीचा दावा करणाऱ्यांच्या प्रभावातून जनसामान्यांना मुक्त करून त्यांच्यात वैज्ञानिक दृष्टिकोन रुजविण्याची, चिकित्सक विचार करण्याची, कार्यकारण भाव समजून घेण्याची व भावनेच्या आहारी न जाता कृती करण्याची गरज कशी आहे यावर भर दिला जात आहे. आध्यात्मिकतेच्या मृगजळाच्या मागे न धावता ऐहिक सुख, सुख समाधानी जीवन पद्धती व मानवतावादी दृष्टिकोन जनमानसात रुजविण्याचे प्रयत्न आपापल्या कुवतीनुसार करत आहेत, हे लेखकाच्या लक्षात आले. परंतु या गोष्टीतसुद्धा नवीन काही नसून आपल्या देशात चार्वाक, लोकायत, संत कबीर, राजाराम मोहन राय, महात्मा फुले, पंडिता रमाबाई, महर्षी कर्वे, गोरा, आगरकर, अब्राहम कोवूर, इत्यादींनी या गोष्टी यापूर्वीच सांगितल्या आहेत.

या पुस्तकाच्या पहिल्या भागात त्रोटकपणे उपलब्ध असलेल्या लिखित साहित्यातून भेटणाऱ्या भारतीय रॅशनॅलिस्ट्सच्या बद्दलची माहिती दिली आहे. या माहितीवरून लेखक आपल्यातील अंधश्रद्धांचे मूळ आपल्यातील धार्मिकतेत आहे, या निष्कर्षाप्रत पोहोचतो. भारतीयांच्या संदर्भातील रॅशनॅलिटी, रॅशनॅलिझम, व रॅशनलायजेशन या संकल्पना पाश्चिमात्य तत्वज्ञांना अभिप्रेत असलेल्या संकल्पनांपेक्षा फार वेगळ्या आहेत हे जाणवते. भारतीय संदर्भात काही वेळा रॅशनॅलिझम म्हणजे न्याय व समता, काही वेळा अहिंसा व सत्यान्वेषण, काही वेळा विचार प्रक्रियेतून दृढ झालेली जीवन पद्धती या अर्थानेसुद्धा वापरला जातो. त्यामुळेच कदाचित

भारतीय रॅशनॅलिस्ट्स स्वतःला बुद्धीवादी, युक्तीवादी, तर्कवादी, विवेकवादी, रॅडिकल मानवतावादी इत्यादी नावाने ओळखले जात असावेत. ही नावे त्या त्या व्यक्तीच्या धर्माबद्दलच्या व परमेश्वराचे अस्तित्व मानणे वा न मानणे या आकलनातून आलेले असावेत. त्यामुळे मानवतावाद, विवेकवाद, नीरिश्वरवाद, समाधानी आयुष्य जगण्यासाठी विचारपूर्वक अनुसरलेला मार्ग, वैज्ञानिक दृष्टिकोन, विज्ञान - तंत्रज्ञानाचा पुरस्कार, पर्यावरणवाद, स्त्रीवाद इत्यादी गोष्टीसुद्धा रॅशनॅलिझमशी जोडलेल्या असतात. रॅशनॅलिझमच्या तात्विक चर्चेसाठी लेखक मॅक्स वेबर व चार्ल्स टेलर यांचा आधार घेतो.

खरे पाहता हे पुस्तक म्हणजे त्याच्या संशोधनावरील प्रबंध आहे. म्हणूनच लेखक स्वतःच्या संशोधनाची वर्गवारी multisided ethnography या सदरात करतो. एखाद्या चळवळीचा एथ्नोग्राफिक म्हणजे वांशिक - सांस्कृतिक गट म्हणून अभ्यास करणं आणि अँथ्रोपॉलॉजिकल म्हणजे मानववंशातील शारीरिक, सांस्कृतिक आणि आचरणात्मक इत्यादी भेदाविषयी अभ्यास करणं. अशा दृष्टिकोनामुळे अभ्यासात बराच फरक पडतो. जॉन यांच संशोधन एथ्नोग्राफिक आहे.

त्याचप्रमाणे सरधोपटपणे केलेल्या संशोधनामध्ये संबंधितांच्या मुलाखती, कागदपत्र - अहवाल व इतर मुद्रित साहित्यांचा अभ्यास, विषयासंबंधीच्या शिबिरांना, अधिवेशनांना हजेरी, ऑडिओ - व्हिडिओ वरून काढलेले मुद्दे इत्यादीवर भर असतो. परंतु हा संशोधक मळलेल्या वाटेने न जाता प्रत्यक्ष कार्यक्षेत्रात जाऊन तेथील मुख्य संघटक व इतर कार्यकर्ते यांच्याशी गप्पा मारून व त्यांच्या कार्यात सहभागी होत निष्कर्ष काढत होता. चिकित्सकपणे त्यांच्या कार्याचा आढावा घेत त्यांचे प्लस व मायनस पॉइंट्स शोधण्यात त्याला रुची होती. एका प्रकारे त्या संघटनेचा तो 'सोशल ऑडिट' करत होता.

या पुस्तकाच्या दुसऱ्या भागात या देशात संघटितपणे केलेल्या रॅशनॅलिझमच्या प्रयत्नांचा आढावा घेतला आहे. चार्वाकापासून सुरुवात झालेली ही परंपरा, वैदिक इहवादात व त्यानंतर भक्ती पंथात स्पष्टपणे दिसून येते. मध्ययुगात प्रचलित असलेल्या अंधश्रद्धेवर संत कबीर व संत तुकाराम यांनी मोठ्या प्रमाणावर आघात केला आहे. परंतु पाश्चात्य तत्ववेत्त्यांना अभिप्रेत असलेले रॅशनॅलिझम ब्रिटिश कालखंडात मूळ धरू लागली. अनेक भारतीय इंग्रजी शिकू लागले. इंगरसॉल, ब्रॅडलॉ, बेझंट यांच्या वैचारिक लेखनाने प्रभावित झाले. 19व्या शतकाच्या उत्तरार्धात आगरकर, फुले, पेरियारसारखे समाजसुधारक रॅशनॅलिझमवर आधारित चळवळी सुरु करण्याच्या प्रयत्नात होते. परंतु त्या मुळातच धार्मिक सुधारणेच्या चळवळी होत्या. जवाहरलाल नेहरू व मानवेंद्र नाथ रॉय यांनी खऱ्या अर्थाने रॅशनॅलिझमचा पाया घातला. गोरा यांनी 1940 साली नास्तिक केंद्राची स्थापना करून रॅशनॅलिझमच्या व्यावहारिक स्वरूपावर भर देण्याचा प्रयत्न केला. र.धों. कर्वे Reason या इंग्रजी नियतकालिकातून रॅशनॅलिझमच्या विविध पैलूवर चर्चा घडवू लागले. या सर्वांच्या प्रयत्नाने प्रेरित होऊन 20 व्या शतकाच्या पूर्वार्धात दिल्ली, हैदराबाद, नागपूर, मुंबई, विजयवाडा, भिलाई, रूरकेला, मद्रास, कोईमतूर, कन्याकुमारी, अमृतसर इत्यादी ठिकाणी रॅशनॅलिझमचा प्रचार व प्रसार करणाऱ्या संघटनांची स्थापना झाली. पाश्चात्य शिक्षणाने प्रभावित झालेले अनेक सुशिक्षित तरुण या कार्यात पुढाकार घेऊ लागले.

या संघटना प्रामुख्याने सत्य साईबाबासारख्या बाबा, बुवा, स्वयंघोषित गुरु, महाराज यांच्या विरोधात जनजागृती करण्याचे प्रयत्न करत होत्या. या संघटना चालवणारे फक्त पेपरमध्ये लेख लिहिणे व भाषण करणे येवढ्याच सीमित अर्थाने काम करत होते. त्या तुलनेने एच नरसिंहय्या व अब्राहम कोवूर

यांचे कार्य मात्र सर्वस्वी वेगळे होते. अब्राहम कोवूर समाजाच्या तळागाळात जावून 'चमत्कारां'च्या प्रयोगांचे सादरीकरण करून त्यामागील विज्ञान समजून देत होते. मोठमोठ्या जनसमुदायासमोरील अशा प्रयोगामुळे लोक प्रभावित होत होते. अब्राहम कोवूर यांची ही गादी बी. प्रेमानंद यांनी चालवली. दक्षिण भारतातील ठिकठिकाणी जाऊन बाबा बुवांचे पर्दाफाश करत होते.
तथाकथित चमत्कार करून दाखवत असल्यामुळे बाबा - बुवा अडचणीत येत होते. प्रयोगांना गर्दी होत होती. स्वातंत्र्योत्तर भारतातील तरुण पिढी चांगलीच प्रभावित झाली व रॅशर्नॅलिस्ट संघटना जोमाने कार्य करू लागल्या.

पुस्तकाचा तिसऱ्या भागात अंनिसची उद्दिष्टे, संघटनात्मक रूपरेषा, कार्यपद्धती, निर्णयप्रक्रिया, कार्यक्रमातील विविधता, व कार्याचा होत असलेला प्रभाव इत्यादींचा समावेश आहे. लेखकाच्या दृष्टीने ही एक एथ्नोग्राफिक स्टडी केस म्हणून व्यक्त होत आहे. भारतातील विवेकवादाच्या प्रगतीचा अभ्यास करण्यासाठी अंनिसचीच निवड का केली हे सांगताना "अंनिसची चळवळ महाराष्ट्राच्या खेड्यापाड्यात पसरलेली आहे. तिचे कार्यकर्ते सर्वात जास्त सक्रीय आहेत. ते सर्व विनावेतन कार्य करणारे स्वयंसेवक आहेत. आणि ते द्रविड कळघम या चळवळीसारखे राजकारणात बिलकुल रस घेत नाहीत."

प्रत्यक्ष चळवळीचे कार्य चालू असलेले क्षेत्र अभ्यासासाठी निश्चित करणं, त्या कार्यात शिरकाव करणं आणि त्या क्षेत्राशी निगडित राहणं, सुरुवातीस कठिण होतं. परंतु नंतर अंनिसच्या कार्यकर्त्यांच्या मोकळेपणामुळे आणि मित्रत्वामुळे ते खूप सुकर झालं, असे लेखकानी मुद्दाम नमूद केले आहे. अंनिसने आखून घेतलेले अंधश्रद्धा निर्मूलनासाठी लढा, वैज्ञानिक दृष्टिकोनाचा प्रचार, धर्मचिकित्सा व व्यापक समाजसुधारणेत सक्रीय सहभाग

या चतुःसूत्रीने लेखक प्रभावित झाला होता. व यांची अंमलबजावणी कशी होते याबद्दल उत्सुकता होती.

दूरदूरच्या खेड्यात अंनिसचे कार्य कसे चालते? खेड्यातील सामान्य लोकांचा प्रतिसाद कसा असतो? खेड्यातल्यांच्यात भिनलेल्या अंधश्रद्धांच्या विरोधात बोलताना कार्यकर्ते कुठली रणनीती वापरत असतात? खेड्यातल्यांचा खरोखरच भ्रम निरास होतो का? कार्यकर्त्यांच्या विधानांना, प्रयोगाच्या सादरीकरणाला प्रत्यक्ष विरोध होतो का? हुल्लडबाजी होते का? धर्मावरील टीका ते सहन करू शकतात का? इत्यादी अनेक प्रश्नांची उत्तरं त्याला हवी होती. त्यासाठी तो चळवळीच्या प्रत्यक्ष कार्यात सहभागी झाला. 2-3 दिवस चालणाऱ्या बैठकींना हजर राहू लागला. प्रसंगी कार्यकर्त्यांच्या घरी राहायचा. अंनिसच्या विज्ञान बोध वाहिनीच्या गाडीतून प्रवासही करायचा. या सर्व प्रत्यक्ष अनुभवातून आणि डॉ. दाभोलकर व इतर अनुभवी कार्यकर्त्यांच्या मुलाखतीतून त्याच्या प्रश्नांना हळू हळू उत्तरं मिळत गेली. जरी ऐकून घेणारे एका दिवसात बदलत नसले तरी कार्यकर्त्यांच्या प्रामाणिकपणाबद्दल त्यांच्या मनात संशय नव्हता. कार्यकर्ते स्वतःच्या कुवतीनुसार उत्तर देत होते. समजून सांगत होते. देव - देवस्की, भूत - भानामती, अघोरी प्रथा यांच्या विरोधात भाष्य करण्यास कार्यकर्ते घाबरत नसतं. या सर्व प्रकारामागे लोकांनी विचार करावे, प्रश्न विचारावेत, आर्थिक नुकसान करून घेवू नये, आंधळेपणानी कृती करू नये, असे उद्देश असल्यामुळे लोकसुद्धा आवडो न आवडो, शांतपणे, सहनशीलपणे कार्यकर्त्यांचे म्हणणे ऐकून घेत असतं.

लेखकानी अंनिसच्या कार्यशैलीचा स्वतंत्रपणे अभ्यास करून या संघटनेचे वैशिष्ट्य व मर्यादा यांच्यावर टीका टिप्पणी केली आहे. अंनिसच्या कार्यपद्धतीवर भाष्य करताना धर्माला विरोध करणे म्हणजेच विवेकवाद का

हा प्रश्न त्याला पडतो. कारण अंनिसची याबद्दलची भूमिका धूसर आहे असे त्याला वाटते. खरे पाहता अंनिस उघड फसवणूक व शोषण करणाऱ्या धार्मिक विधींना व इतर गोष्टींना अंधश्रद्धेइतकेच विरोध करते व बुरसटलेल्या रूढी परंपरेसाठी वैज्ञानिक दृष्टिकोन हा एकमेव उपाय आहे यावर भर देते.

वैयक्तिक आयुष्यात रॅशनॅलिझम कशा प्रकारे आधार देतो याविषयीची भरपूर माहिती लेखकानी कार्यकर्त्यांच्या मुलाखतीतून गोळा केली आहे. विवाह, विवाह सोहळा, कौटुंबिक संबंध, जन्म, मृत्यु, प्रेताची विल्हेवाट इत्यादीसंबंधीची कार्यकर्त्यांची मत तपासली आहेत. अंनिसच्या कार्यकर्त्यांच्या मते अन्यायाविरुद्धचा लढा म्हणजे अविवेकीपणाच्या विरोधाचा लढा असतो. लेखकाला फुले यांच्या सत्य शोधकी पद्धतीचा निधर्मी विवाह सोहळा फार आवडलेला होता.

पुस्तकाचा शेवट करताना लेखक भारतातील रॅशनॅलिझमची चळवळ 'चमत्कार' व 'अतींद्रिय शक्ती'च्या समजुतीला कवटाळून बसलेल्या भारतीय समाजाला बाहेर काढणारी आहे, असे नमूद करू इच्छितो. रॅशनॅलिझमच्या चळवळीचा जोर जगभर पसरत असून भारतीय चळवळसुद्धा त्या जागतिक चळवळीचा भाग होण्याच्या प्रक्रियेत आहे, असे लेखकाला वाटते.

भारतातील रॅशनॅलिस्ट चळवळींचा सर्वंकश आढावा घेणारे इंग्रजीतील एक चांगले पुस्तक!

**Disenchanting India:**

Organised Rationalism and Criticism of Religion in India

*Johannes Quack*

Oxford University Press, 2012

pp 362, Price: Rs 995



# गणितस्य कथा: रम्या:

*एकंदरीत मानवी संस्कृतीच्या प्रगतीमध्ये गणित या विषयाचा सिंहाचा वाटा असूनही गणित, गणितज्ञ, आणि गणिताचा इतिहास या बाबतीत समाजात सर्वसाधारणपणे अनभिज्ञता आढळते. अच्युत गोडबोले आणि माधवी ठाकूरदेसाई या लेखकद्वयीनं मात्र या परिस्थितीला छेद देऊन अगदी अनादी काळापासून ते आजच्या आधुनिक उच्चस्तरीय गणितापर्यंतच्या या विषयाच्या प्रवासातले महत्वाचे टप्पे, ते गाठण्यात महत्वाचा वाटा असणारे गणितज्ञ आणि एकूणच गणिती प्रक्रियेचा गुंतागुंतीचा इतिहास वाचकांपुढे रंजकपणे मांडला आहे – त्याबद्दल त्यांचे आभार मानावे तेवढे थोडके!*

- डॉ. श्रीकृष्ण दाणी

पुस्तकाच्या मलपृष्ठावर छापलेल्या वरील ब्लर्बमध्ये आय आय टी पवईचे गणितज्ञ, डॉ. श्रीकृष्ण दाणी यांनी या पुस्तकातील आशयावर व लेखकद्वयांनी घेतलेल्या परिश्रमावर योग्य शब्दात कौतुक केले आहे, हे पुस्तक वाचून संपवताना जाणवते. लेखकांनी एके ठिकाणी म्हटल्याप्रमाणे गणित चांगल येणं म्हणजेच बुद्धीमान असणं उगीचच म्हटलं जातं. तसे पाहता गणित विषयात शंभर टक्के गुण मिळवणाऱ्यांची बुद्धिमत्ता तीक्ष्ण असू शकते असे वाटत असले तरी गणित हे काही बुद्धी मोजण्याचे मापन होऊ शकत नाही. बुद्धी एकमितीय नसते, तर ती बहुमितीय असते. अधिक खोलावर आणि अचूक नीरिक्षण करणं आणि ते लक्षात ठेवणं हा बुद्धीचा पैलू असू शकतो. परंतु केवळ आकडेमोड करता येणं हा काही बुद्धीचा पैलू असतो असे म्हणता येणार नाही. काही लोक भराभर आकडेमोड करण्याच्या पद्धती किंवा सूत्रं यांनाच 'गणित' असं म्हणतात. पण यामध्ये एक गोष्ट लक्षात ठेवायला पाहिजे. भराभर आकडेमोड करण्याचा ग्रुप थिअरी, टोपॉलॉजी, गेम थिअरी, सेट थिअरी, नॉन युक्लिडियन जॉमेट्री, अशा

गणिताच्या अनेक मूलभूत कल्पनांचा फारसा संबंध नाही. थोडक्यात जलद  आकडेमोड करणारी मंडळी गणितज्ञ असतातच अस नाही; आणि गंमत म्हणजे, उत्तम किंवा थोर गणितज्ञ असला तरी तो भराभर आकडेमोड करू शकेलच असं नाही. गणिताच्या इतिहासातले कित्येक मोठे गणितज्ञ भराभर आकडे मोड करू शकत नव्हते. भारतातले आर्यभट्ट, भास्कराचार्य, माधव, नीळकंठ, रामानुजन किंवा युरोपातले




न्यूटन, गाऊस, आणि ऑयलर असे अनेक गणितज्ञ त्यांच्या जलद आकडेमोड करण्यामुळे मोठे गणितज्ञ ठरले नव्हते, तर त्यांच्या गणितातल्या मूलतत्वांमध्ये मोलाची भर टाकल्यामुळे! याचाच प्रत्यय या पुस्तकातील गणितज्ञांचे चरित्र वाचताना येत राहतो.

विज्ञान व तंत्रज्ञान (व काही प्रमाणात तत्वज्ञान) यांच्या विकासात अनेक गणितज्ञांचा सहभाग होता, हे आपण नाकारू शकत नाही. तत्वज्ञानाचा काय संबंध हा प्रश्नही येथे विचारला जाऊ शकतो. परंतु गणितज्ञसुद्धा एखाद्या तत्वज्ञाप्रमाणे या जगातल्या घडामोडीविषयी आपल्या तऱ्हेने भाष्य करत असतात. गणितीय संकल्पनांमुळे विज्ञान – तंत्रज्ञानांनी भार मोठी झेप घेतली व मानवीय जीवनात क्रांती झाली. अशा गणितीय संकल्पना, या संकल्पना

त्यांना कशा सुचल्या, त्यांच्या जीवनातील चढ उतार, त्यांच्याबद्दलच्या आख्यायिका, इत्यादी वाचत असताना आपण एका वेगळ्या जगात वावरत आहोत की काय असे वाटू लागते. या पुस्तकातील लेखांचा फोकस गणितज्ञांच्या जीवनावर केलेले असल्यामुळे व संकल्पनांच्या जास्त खोलात न शिरता वा गणिती संज्ञांच्या जंजाळात अडकून न पडता मांडणी केल्यामुळे सर्व लेख वाचनीय झाले आहेत. गणित व विज्ञान यातील सर्जनशीलता कशी फुलत जाते हे आपल्या लक्षात येऊ लागते.

गंमत म्हणजे, गणित हे केवळ विज्ञानाचा मदतनीस म्हणून येथे फोकस होत नाही. गणिताला एक स्वतंत्र अस्तित्व आहे, त्याची एक वेगळी आयडेंटिटी आहे, त्याचे एक वेगळे जग आहे, त्या जगातील नियमही ज्ञात जगापेक्षा वेगळे असू शकतात हे लेख वाचताना लक्षात येऊ लागते. मुळात गणित हे स्वतःच्याच साम्राज्यात मश्गुल असतं. व गणित कुठलीही गोष्ट सुसंगत व तर्कशुद्ध आहे की नाही याचा शोध घेत असतं. गृहितकात विसंगती वा परस्पर विरोधी असे काही असल्यास गणित त्याला बाद करतं. त्यामुळे जग समजून घेण्यासाठी जसे विज्ञानाला गणिताला शरण जाव लागतं तसे गणिताला मात्र विज्ञानापुढे हात पसरण्याची गरज भासत नाही. गणित विज्ञानाची जननी आहे किंवा क्वीन ऑफ ऑल सायन्सेस हे केवळ बोधवाक्य न राहता विज्ञानाचा डोलारा गणितावर कसा उभा राहिला हे पुस्तक वाचताना जाणवते. गणित म्हणजे क्लिष्ट संज्ञाने भरलेला, काहीतरी चित्र विचित्र मांडणी करणारा, प्रत्यक्ष व्यवहारात उपयोगी न पडणारा, उंच मनोऱ्यात वावरणाऱ्यासाठी असलेला अशी जी कल्पना गणिताबद्दल असते किंवा आहे, याला खोटे पाडण्यात गणितीचे लेखक यशस्वी झाले आहेत.

पुस्तकाच्या अनुक्रमणिकेवर नजर टाकल्यास या पुस्तकाचा आवाका लक्षात येऊ लागतो. प्राचीन काळातील माणसाला अंक मोजता यायला

लागल्यावर या संख्या मोजताना पाया (बेस) कोणता घ्यायचा या प्रश्नावर त्यानी हाताची बोट पाच असल्यामुळे पाचवर आधारित गणन पद्धती तो वापरू लागला. सुमारे 5500 वर्षापूर्वीच्या सुमेरियन व बॅबिलोनियन संस्कृतीच्या काळात 60 च्या पायावर आधारित असलेली सेक्साजेसिमल पद्धत वापरली. नंतरच्या इजिप्तमधील नाइल संस्कृतीच्या काळात भव्य पिरॅमिड्सची रचना झाली. या पिरॅमिड्ससाठी इजिप्तच्या तज्ञांनी कुठले गणित वापरत होते याचा पुरावा उपलब्ध नसला तरी त्यांना अपूर्णांकांची नोटेशन पद्धत व गुणाकार यांचा वापर कसा करावा हे माहित होते.

भारतीय गणिताचा आढावा घेताना यज्ञवेदीच्या अचूक रचनेसाठी वापरलेले वेदकालीन शुल्वसूत्र (इ.स.पू. 800), त्रिकोणमितीत लागणाऱ्या साईन फंक्शनचा विचार करणारे आर्यभट्ट (इ.स. 476-550), जगाला शून्य ही कल्पना बहाल करणारे ब्रह्मगुप्त (इ.स. 597–668), खगोलशास्त्र व गणित यांचा ताळमेळ घालणारे व *लीलावती*चे ग्रंथकर्ते दुसरे भास्कराचार्य (इ.स. 1114-1185) यांच्या पर्यंतचा सुमारे 2000 वर्षाचा सुवर्ण काळ लेखक आपल्या डोळयासमोर उभे करतात.

ग्रीक संस्कृतीच्या कालखंडात गणिताची भरभराटी झाली. निसर्गातील घटनाक्रमांना दैववादी दृष्टीने न पाहता डोळस दृष्टीने पाहण्यास सांगणारा थेल्स (इ.स.पू. 624 – 546), वाळूवर रेघोट्या मारत काटकोन त्रिकोनाचे गुणधर्म शोधणारा व संख्यांना दैवी शक्ती बहाल करणारा पायथॅगोरस (इ.स.पू. 570–495), डिटर्मिनंट व इन्फिनिटी या कल्पनांचा विकास करणारा झेनो (इ.स.पू. 490-430), भूमितीतील प्रश्नांची उत्तर अंकगणितात शोधणारा यूडॉक्झस (इ.स.पू. 408-355), 'एलेमंटेस' या ग्रीक गणितावरील पुस्तकाचा लेखक युक्लिड (इ.स.पू. 330-275), गणिताचा व्यावहारिक वापर करणाऱ्या अप्लाईड मॅथेमॅटिक्स या गणित शाखेचा शोध घेणारा व 'युरेका युरेका'

म्हणत आनंद व्यक्त करणारा अर्किमिडीज (इ.स.पू. 287-212) इत्यादी ग्रीक गणितज्ञांनी काही मोजकी साधनं वापरून व केवळ विचार प्रयोगातून कित्येक मूलभूत संकल्पनांच्यावर काम केलेले आहे याचे आश्चर्य वाटू लागते. *समांतर रेषा एकमेकांना कधीच मिळत नाहीत, त्रिकोणांच्या तीन कोनांची बेरीज 180 असते* अशा अनेक व्याख्या व गृहितकांची नोंद युक्लिडच्या पुस्तकात सापडतात. परंतु या युक्लिडियन जॉमेट्रीला आव्हान देणारे महाभाग पुढील काळात होवून गेले तरी ग्रीक गणितज्ञांचे योगदान आपण सहजासहजी विसरू शकत नाही.

यानंतर अरब लोकानी गणिताचा वारसा पुढे चालवला. बीजगणितासारखी महत्वाची शाखा सुरु करण्याचे श्रेय अरबांना जाते. इस्लामिक साम्राज्याच्या भरभराटीच्या काळात भारतीय व ग्रीक गणिताच्या पुस्तकांचे भाषांतर करण्यासाठी उत्तेजन मिळाल्यामुळे व अरब व्यापारी जगभर प्रवास करत असल्यामुळे गणित सर्वदूरपर्यंत पोचू शकले. पुढील काळात युरोपियन गणितज्ञ या पुस्तकांच्या आधारे गणिताचा अभ्यास करत या शाखेत भर घालू लागले. आणि आधुनिक गणिताचा जन्म झाला.

आधुनिक गणितातील अनेक दिग्गजांच्यावर येथे लेख आहेत. लोगॅरिदम्सचा शोध लावणारा जॉन नेपियर (1550-1617), बीजगणित व भूमितीला नवे परिमाण प्राप्त करून देणारा रेने देकार्त (1596-1650), कोनिक्सवर आयुष्य वेचणारा ब्लेझ पास्कल (1623-1662), जगाला कोड्यात टाकणारा पियरे दि फर्मा (1601–1665), बायनॉमियल सिद्धांत व कॅल्क्युलसवर हक्क सांगणारा आयझ्याक न्यूटन (1642-1727), ब्रिटिश गणितज्ञांच्या तडाख्यात सापडून नामोहरम झालेला व न्यूटनचा समकालीन फ्रेंच गणितज्ञ गॉटफ्राइड लेब्निट्झ (1646-1716), 17व्या व 18व्या शतकातील बेर्नुली गणितज्ञांचं घराणं, ग्रुप थिअरीचा जनक लेन्हार्ड ऑयलर

(1707-1783), नेपोलियन बोनापार्टचा लाडका गणितज्ञ जोसेफ लाग्रांज (1736-1813), गणिताच्या नव्या वाटा शोधणारा परंतु राजरोषाला बळी पडलेला गॅस्पार्ट माँज (1746-1818), गणिताला आधुनिक स्वरूप देणारा व गणितात ॲनालिसिस (विश्लेषण) पद्धतीला वेगळे स्थान देणारा कार्ल गाउस (1777-1855), क्विंटिक समीकरणासाठी ($x^5$) आयुष्य वेचणारा नील्स आबेल (1802-1827), 22व्या वर्षी नाहकपणे मृत्युला कवटाळणारा परंतु मृत्युच्या अगोदरच्या काही तासात लिहिलेल्या 60 पानात ग्रुप थिअरीची संपूर्ण कल्पना देणारा एव्हिरिस्ट गॅल्व्हा (1811-1832), झीटा फंक्शनचा जनक जॉर्ज बर्नार्हर्ड रीमान (1826-1866), टोपॉलॉजीला शिखरावर पोचवणारा हेन्री पॉइनकरे (1854-1912), सेट थिअरी आणि इन्फिनिटीची संकल्पना मांडणारा जॉर्ज कँटर (1845-1918), उच्च गणितात बहुमोल भर घालणारा श्रीनिवास रामानुजन (1887-1920), गेम थिअरीला विकसित करणारी जॉन न्यूमन (1903-11957) व (ब्यूटिफुल मांइंड या गाजलेल्या चित्रपटाचा) जॉन नॅश यांची जोडी, इत्यादींच्या बद्दल वाचताना वाचक संभ्रमित होतो आणि गणित म्हणजे आकडेमोड किंवा संज्ञांचे जंजाळ या मानसिकतेतून मुक्त होतो. लेखक गणितज्ञांच्या सर्जनशीलतेची ओळख करून देत असतानाच माणूस म्हणूनही ते कसे होते याचे चित्र आपल्या डोळयासमोर उभे करतात. त्यामुळे या सर्व लेखांकडे ह्युमन इंटरेस्ट स्टोरी म्हणूनही आपण पाहू शकतो.

सामान्य वाचकांना गणित विषयात सामावून घेण्यासाठी लेखक अंकगणित, बीजगणित, कॅल्क्युलस, नॉन-युक्लिडियन जॉमेट्री, स्टॅटिस्टिक्स, प्रॉबॅबिलिटी, लॉजिक, इत्यादी विषयांचा विस्तृतपणे परिचय करून देत आहेत. 0 ते 9 संख्याचा वापर करणारी दशमान गणन पद्धती, 2च्या पायावर आधारित असलेली बायनरी (द्विमान) गणन पद्धती म्हणजे नेमके काय

उलगडत होता. त्याकाळच्या वैशिष्ट्य लक्षात येत होते. कलाकारांचे अंतरंग व निर्मितीप्रक्रियेतील खाच-खळगे कळत होते. रूढ प्रकारचे प्रश्न न विचारता कलाकारांना बोलते करत होते. कुणाच्या खासगी आयुष्याविषयी ते कधीच आपणहून प्रश्न कधीच विचारत नसतं. कुठलेही फाजिल कुतूहल त्यांच्या मुलाखतीतून व्यक्त होत नव्हते. मुळात गॉसिपविषयी त्यांना तिटकारा असल्यामुळे कलाकार आपणहून अनेक विषयावर गप्पा मारत असत. त्यामुळे मुलाखती जिवंत वाटायच्या. हे सर्व अनुभव विविध प्रकारचे असत व त्यातूनच राणे यांचे कलाविश्व समृद्ध होत गेले.  त्यांच्या मते ग्रेट सिनेमाटोग्राफर व्ही.के.मूर्ती व श्याम बेनेगल यांची त्यानी घेतलेले उत्कृष्ट मुलाखती होत्या. त्यांनीच उल्लेख केल्याप्रमाणे मुळात मुलाखती हे निमित्त, परंतु ज्येष्ठ-श्रेष्ठ मंडळीना भेटणं व त्यांच्या तोंडून सिनेमा व इतर सर्व कला व त्यांच सौंदर्यशास्त्र आणि त्या त्या काळचा बदलत्या समाजाबद्दल जाणून घेणं हे महत्वाच होतं. प्रेक्षक व वाचक यांच्या आवडी-निवडीतील होत गेलेले बदल हेही तितकेच महत्वाचे आहेत, असे राणे यांना वाटते.

मागच्या पिढीतल्या सिने रसिकांचे जागतिक सिनेमाविषयीचे कुतूहल शमविण्यासाठी  फिल्म सोसायटीच्या चळवळींने भरपूर मदत केली. परंतु  नव्या पिढीतल्या रसिकांना जागतिक सिनेमा घरबसल्या पाहता येऊ शकल्यामुळे फिल्म सोसायटींची उपयुक्तता जाणवेनाशी झाली. 16 व 35 एमएमची फिल्म्सची रिळं व त्यासाठीचे प्रोजेक्टर या वेळखाऊ तंत्रज्ञानाऐवजी व्हिडिओ टेप्स व प्रोजेक्टर्सचा वापर करून चित्रपट पाहता येऊ लागले. त्यानंतरच्या काळात सिडी, डीव्हिडींचा जमाना आला, डिजिटल माध्यमाच्या क्रांतीमुळे हार्ड ड्राइव्ह्जवर हजारो फिल्म्स उपलब्ध होऊ लागल्या. 24 तास रतीब घालणाऱ्या टीव्हीवर अधून मधून अभिजात चित्रपट सादर होऊ लागले. चित्रपटासाठीचेच टीव्ही चॅनेल्स आल्यामुळे प्रेक्षक त्याकडे वळले. त्यामुळे नव्या पिढीतला प्रेक्षकवर्ग सिनेमा पाहायला फिल्म सोसायटीपर्यंत कशाला जाईल?

परंतु राणे यांचे चित्रपटप्रेम स्वस्थ बसणारे नव्हते. विरंगुळा म्हणून चित्रपट पाहणारा वर्ग वगळता अनेक रसिकांना या कलेतील बारकावे समजून घेण्याची इच्छा असते, हे राणेंनी हेरले व त्यासाठी नवीन पिढीला उद्युक्त करण्यासाठी चित्रपट रसग्रहणाच्या कार्यशाळेची कल्पना त्यांनी लढविली. त्यांना सिनेमा आणि साहित्य, सिनेमा आणि नाटकं, सिनेमा आणि संगीत, सिनेमा आणि चित्र-शिल्प-वास्तुकला, सिनेमा आणि लोककला, सिनेमा आणि समाज असे विषय घेऊन तरुण रसिकांना जाणते करायचा विचार होता. परंतु त्यांना आर्थिकरित्या साथ मिळाली नाही, असे विषादाने नमूद करावेसे वाटतेल.

राणेंनी आपली दिग्दर्शक होण्याची इच्छा काही चांगल्या डॉक्युमेंटरींची निर्मिती करून पूर्ण करून घेतली. त्यांच्या डॉक्युमेंटरीतील विषयाची मांडणी थेट व बंदिस्त असते, याबद्दल शंकाच नाही. सिंगिग इन सिनेमा वा बिईंग विथ अपू मध्ये ते प्रकर्षाने जाणवते.  त्यांच्याच पटकथा –दिग्दर्शन असलेल्या गिरणगावावरील आणखी एक मोहंजोदारो व संवादिनी साधकः पं. तुळशीदास बोरकर डॉक्युमेंटरीजमध्ये जीव ओतून काम केले होते. त्यांच्या सर्वच्या सर्व डॉक्युमेंटरीजना सिनेरसिकांकडून चांगला प्रतिसाद मिळत असे.

लाइट, ॲक्शन, कॅमेरा व दृश्यसातत्यातून सिनेमाच्या तंत्रज्ञानानी अजून पर्यंत ज्ञात नसलेल्या एका कलेला जन्म दिले. गेली शंभरेक वर्षे अनेक फिल्ममेकर्सनी त्यांच्या सर्जनशीलतेतून रसिकांना एक वेगळाच आनंद दिला.  द्विमितीतून त्रिमितीचा आभास निर्माण करण्यात ते सर्व यशस्वी झाले. राणेनीसुद्धा या कलेला एका वेगळ्या पातळीवर नेऊन ठेवण्याचा प्रयत्न केला. जगभरातील अत्यंत गाजलेल्या फिल्ममेकर्सची राणे यांनी करून दिलेला परिचय चित्रपट रसिक सहजासहजी विसरू शकणार नाही. राणे यांनी हे पुस्तक लिहून रसिकांच्या चित्रपटविषयक जाणिवेत भर घातल्याबद्दल रसिक त्यांना नक्कीच धन्यवाद देतील. उत्कृष्ट चित्रपटातील महत्वाच्या जागांचा उल्लेख करत त्यातील सब्लिमिनल एलिमेंटकडे लक्ष वेधणारे हे एक अतिशय सुंदर पुस्तक आहे.

त्यांच्या या पुस्तकाचे निर्मितीमूल्य उत्कृष्ट असून सर्व संबंधितानी भरपूर कष्ट घेतल्याचे जाणवते.

एक अविस्मरणीय आनंद देणारं पुस्तक !

**सिनेमा पाहणारा माणूस**

*अशोक राणे*

संधीकाल प्रकाशन

किंमत 550 रु, पानेः 512



# सिनेसंगीताच्या अनोख्या जगामध्ये..

गाणं आवडत नसेल असा माणूस विरळाच. गाण ऐकणं आणि गुणगुणणं हे बहुतेकांना आवडतं. गाण्याची उपजत आवड असणारे पुष्कळ असतात आणि आपल्यावर संस्कार करून घेत आपल्या रसिकतेची कक्षा रुंदावणारेही पुष्कळ असतात. गाणं साऱ्या खंडामध्ये, सगळ्या संस्कृतीमध्ये आहे. मानवी जगण्याला इतकी लगत चिकटलेली, सातत्याने चिकटलेली कला दुसरी क्वचितच कुठली नसेल....

*--- पान चारवरून*

नवे आवाज, नवी गाणी, नवे प्रयोग, नवे सांगीतिक विचार, जोडीला नवे तंत्र, नवे मंत्र – या साऱ्यांनी गेल्या दहा पंधरा वर्षात बदलून टाकले चित्रपटसंगीताचा चेहरा. आपल्या आसपास रुंजी घालणाऱ्या या तरुण गाण्याविषयी एका सर्जन रसिकानं मारलेल्या मनमोकळ्या गप्पा...

*--मलपृष्ठावरून*

डॉ आशुतोष जावडेकर या चित्रपट संगीत रसिकाने लिहिलेले 'नवे सूर अन् नवे तराणे' या पुस्तकाद्वारे वाचकांना सिनेसंगीताच्या कालपटाची रोमहर्षक सफर घडवून आणली आहे. येथे आपल्याला या क्षेत्रातील अनेक जुने-नवे दिग्गज भेटतात. त्यांच्या कर्तृमकर्तृत्वाची आपल्याला ओळख होते. व या बेभरवश्याच्या क्षेत्रात नाव कमवण्यसाठी त्यांनी घेतलेल्या कष्टाची, बौद्धिक श्रमाची आपल्याला कल्पना येते. के.एल. सैगल, नूरजहाँ, आर.सी. बोराल, शमशाद बेगम, देविका राणी, अशोक कुमार, शांता आपटे, के. सी. डे, गुलाम हैदर, सुरेंद्र, सुरैय्या, पंकज मलिक, सचिन देव बर्मन, राहुल देव बर्मन, जयदेव, शंकर जयकिशन, ओ.पी.नय्यर, मदन मोहन, सलील चौधरी, सी. रामचंद्र, के. दत्ता, रवी, स्नेहल भाटकर, वसंत देसाई, कल्याणजी-आनंदजी, लक्ष्मीकांत प्यारेलाल इ.इ. जुन्या जाणत्या गायक/गायिका व

संगीतकारांची येथे आपल्याला लेखक भेट घडवतात. त्याचप्रमाणे नव्वदी नंतरच्या दशकातील सिनेसंगीत क्षेत्रात चमकलेले (व चमकत असलेले) ए. आर. रेहमान, इलायराजा, एम एस क्रीम, हॅरीस जयराज, जतिन-ललित (पं जसराजचे पुतणे), नदीम श्रवण, अनू मलिक, उत्तमसिंग, राम-लक्ष्मण (खरे नावः विजय पाटील), राजेश रोशन, संदीप चावटा, शंकर महादेवन-एहसान-ऱ्लॉय (SEL), हिमेश रेशमिया, पार्श्व संगीतकार सलीम सुलेमान, प्रीतम चक्रवर्ती, माँटी शर्मा, आदेश श्रीवास्तव, संदेश शांडिल्य, विशाल (दादलानी)-शेखर(रावजिया), शंतनू मोईत्रा, नुसरत फतेह अलीखाँ, अलका याज्ञिक, कविता कृष्णमूर्ती, साधना सरगम, सुनिधी चौहान, श्रेया घोषाल, उदित नारायण, शान, सोनू निगम, सुखविंदरसिंग, मोहित चौहान, कैलाश खेर, अलिशा चेनॉय, महालक्ष्नी अय्यर, जसविंदर नरुला, वसुंधरा दास, चित्रा, आकृती ककर, शिल्पा राव, झुबिन, नरेश अय्यर, कुणाल गांजावाला, रेमो फर्नांडिस, अदनान सामी, इला अरुण, शुभा मुद्गल, कविता सेठ, बेला शेंडे, वसंत देसाई, श्रीनिवास खळे, हृदयनाथ मंगेशकर, सुधीर फडके, दत्ता डावजेकर, श्रीधर फडके, भास्कर चंदावरकर, डॉ. सलील कुलकर्णी, कौशल इनामदार, अजय-अतुल इत्यादींच्या चढउताराबद्दल, त्यांच्या वैशिष्ट्यपूर्ण सर्जनशीलतेबद्दल भरभरून लेखक सांगू इच्छितात. साठ-सत्तरच्या काळातील दहा-पंधरा कलाकारांची मक्तेदारी मोडून या क्षेत्रात स्वतःचा ठसा उमटविण्याच्या प्रयत्नांना लेखक मनभरून दाद देतात व वाचकांना हे सर्व समजून घेण्यासाठी प्रेरित करतात. नावांची ही यादी वाचूनच वाचक भारावलेल्या अवस्थेतच पुस्तक वाचून संपवतो.

1913साली चित्रपट महर्षी फाळके यांनी ‘राजा हरिश्चंद्र’ या चित्रपट निर्मीतीतून भारतीय चित्रपटाची मुहूर्तमेढ रोवली. व त्यानंतरच्या मूकचित्रपटांना साथ म्हणून थिएटरमध्ये चित्रपट चालू असताना निवेदक

अधून मधून दृश्य समजावून सांगत होता. तेव्हासुद्धा चित्रपटाच्या या जगात गाण्या-बजावण्याला काही स्थान मिळेल अशी अंधुकशी कल्पनाही नव्हती. परंतु 1931साली ‘आलम आरा’ हा बोलपट झळकल्यावर मात्र गायक-संगीतकारांसाठी एक मोठ्ठ क्षेत्र सापडलं असे म्हणावयास हरकत नसावी. हे चित्रपट माध्यम गाण्याला आपलसं करणार आहे, एवढेच नव्हे तर गाणं व संगीत त्याचं मूळ शक्तिस्थान होईल याचा अंदाजही कुणी त्याकाळी करू शकले नसतील. परंतु गेल्या 70-80 वर्षात सिनेसंगीताला प्राधान्य मिळाले व म्हणता म्हणता हे गाणे - बजावणे तमाम सर्व रसिकांना आवडू लागले.

लेखकानी आजच्या काळच्या संगीताबद्दल लिहिण्यापूर्वी हिंदी चित्रपट संगीताचा धावता आढावा चांदनी रातें या पहिल्या प्रकरणात घेतला आहे. त्या काळी चित्रपट निर्मिती स्टुडिओमधून होत होती. तंत्रज्ञ व कलाकारांना स्टुडिओचे मालक पगारावर नेमणूक करत व मोठ्या प्रमाणात पैसेही कमवत. मदन थिएटर्स, बंगाल न्यू थिएटर्स, इंपीरियल स्टुडिओ, वाडिया मूव्हीटोन, शांताराम यांचा प्रभात स्टुडिओ ही नावे त्या काळी चिरपरिचित होत्या .पार्श्वसंगीताची सोय उपलब्ध होती. परंतु त्याचा वापर कसा करायचा हे माहित नव्हते. न्यू थिएटर्सचे नितिन बोस यानी पंकज मलिक यांच्याकडून पहिल्यांदा प्लेबॅक पद्धतीचे गाणे रेकॉर्ड केले व चित्रपटात वापरला. तो कमालीचा हिट् झाला. मग मात्र गायकांचे व संगीतकारांचे कार्य क्षेत्र पूर्ण बदलले. त्यांना एक प्रचंड अवकाश मिळाला. व गेली 80-90 वर्षे हा अवकाश सिनेसृष्टीत पसरला. (काही काळानंतर मुंबईचे बॉलिवुड हिंदी चित्रपटांची राजधानी झाली.)

महाराष्ट्रात प्रभातचे गोविंदराव टेंबे, मास्टर कृष्णराव, बंगालमध्ये आर सी बोराल, पंकज मलिक यांचे नाव झाले. 35-36मध्ये ‘अछूत कन्या’ या चित्रपटातली गाणी गाजली. याच सुमारास कुंदनलाल सैगल आपले नशीब

आजमावण्यासाठी कलकत्त्याला दोनशे रुपये पगारावर काम करण्यास दाखल झाला. व नंतर त्यानी एक काळ गाजविला. 30-40च्या दशकात 900 पेक्षा जास्त चित्रपटांची निर्मिती झाली. व प्रत्येक चित्रपटात सरासरी दहाच्यावर गाणी होती. यातली कित्येक गाणी फ्लॉपही झाले असतील. परंतु 'पूरण भगत' या चित्रपटातील सैगलची एकूण एक गाणी हिट् ठरल्या. गंमत म्हणजे सैगल हा स्टार गायक – अभिनेता होता. अशा स्टार-गायक-अभिनेता/ अभिनेत्रीचाही एक जमाना होता. एकेक नावं चमकायला लागली. नूरजहाँ, शमशाद बेगम, देविका राणी, अशोक कुमार, शांता आपटे, के. सी. डे, गुलाम हैदर, पंकज मलिक, सुरेंद्र, सुरैय्या, अशी किती तरी नावे त्याकाळी गाजली. गाणी फार संथ होती. तरीसुद्धा प्रेक्षक आवडीने ऐकत होते. 40-50 च्या दशकानंतरच्या काळात पंजाबी ढंगाच्या, उडत्या चालींच्या गाण्यांचा बहर आला. अनेक गाण्यामध्ये पाश्चात्य सुरावटीचे रंगही मिसळले गेले. एक वेगळं फ्यूजन संगीत क्षेत्रात पाय रोवू लागले. हा एक सर्वस्वी वेगळा प्रयोग होता. व प्रेक्षकांनी या प्रयोगांना भरभरून साद दिला. पुढील सुवर्णयुगाची ती चाहूल होती. संगीतकारांचा व गायक/गायिकेंचा एकच कल्लोळ पुढील 20-30 वर्षात ठळकपणे दिसू लागला.

या जमान्यात जगमोहन, ख़ान मस्ताना, जी. एम्. दुराणी, मास्टर निसार, सुरेंद्र, सैगल, तलत महमूद, रफी, किशोर कुमार, पारुल घोष, राजकुमारी, नूरजहान, उमादेवी (टुणटुण), गीता दत्त, ज्युथिका रॉय, मुबारक़ बेग़म, बेग़म अख़्तर, लता, आशा असे गाण्याच्या जगातील मातब्बर मोहरे कालपटावर चमकू लागले. शैलेंद्र, साहिर लुधियानवी, शकील बदायुनी, राजा मेहदी अली ख़ान, मजाज़, फैज़ अहमद फैज़, सरदार जाफ्री, इ.इ. एकापेक्षा एक असे सरस गीतकार पटकथेच्या मागणीप्रमाणे गीत लिहू लागले. गीत-संगीतांच्या खाणीतील रत्नांना पैलू पाडणारे नौशाद, ख़य्याम, शंकर-

जयकिशन, सचिन देव बर्मन, अनिल बिश्वास, एन्. दत्ता, रवी, सी. रामचंद्र, कमल दासगुप्ता, सज्जाद हुसेन, हुस्नलाल-भगतराम इत्यादी संगीत रचनाकारांनी तो काळ गाजविला.. त्यांच्या सर्जनशीलतेला दाद द्यावी असा तो काळ होता.

शंकर जयकिशन, सचिन देव बर्मन, ओ.पी.नय्यर, मदन मोहन, सलील चौधरी, के. दत्ता, स्नेहल भाटकर, जयदेव इत्यादी संगीतकार नव- नवीन प्रयोग करू लागले. तंत्रज्ञानात सुधारणा होत होती. 1950-70 च्या काळातील सिनेसंगीत खऱ्या अर्थाने लोकसंगीत झाले. गीता दत्त, लता व आशा या मंगेशकर भगिनीनी मुक्तहस्ताने स्वरांना उधळले. लता व रफी यानी गायिलेली गाणी या काळात हिट् ठरली. या गायक/गायिकाने चित्रपट रसिकांना भरभरून दिले. या काळात गायकीचा पोत आणि वजन पार बदलून गेले. याच सुमारास लक्ष्मीकांत प्यारेलाल, कल्याणजी आनंदजी या संगीतकार जोडींनी चित्रपट संगीताला वेगळे वळण लावण्याचा प्रयत्न केला. काही वेळा त्यानी उत्कृष्ट गाणे दिलेही असतील परंतु बहुतेक वेळा रद्दड गाण्याचा रतीब टाकल्यासारखे त्यांचे संगीत वाटू लागले. हिंदी सिनेसंगीतात लता-आशाची मक्तेदारी असलेल्या जमान्यात कल्याणजी आनंदजीचे एक मोठे श्रेय म्हणजे त्यांनी किती तरी नवीन आवाज समोर आणले.. मनहर उधास, कुमार सानू, अलका याज्ञिक, साधना सरगम, सुनिधी चौहान... अशी किती तरी नावे घेता येतील. राहुल देव बर्मन, बप्पी लाहिरीसारख्या संगीतकारानी संगीताचा चेहरा मोहरा पूर्णपणे बदलून टाकला. संगीत हळू हळू पालटू लागले. तलत महमूद, सैगल, रफी इत्यादींचे उदास, संथगतीचे गाणे मागे पडू लागले. किशोर कुमारची तरूण मस्ती पसरू लागली. परंतु याच सुमारास काही तरी खटकू लागले याची जाणीव होऊ लागली. सुवर्णयुगाला ओहोटी लागली.गाण्यातील धागडधिंगा जाणवू लागला. नवे

आवाज येत होते. येसूदासने काही काळ गाजविला. गझल गायकीचा चित्रपट क्षेत्रात प्रवेश होऊ लागला. डिस्को संगीतानेसुद्धा ठसा उमटविला. नवे ठेके येत होते. लेखकाच्या मते नवे आवाज चांगले असले तरी अननुभवी होते. नव्वदीचे दशक उजाडले. नदीम श्रवण, रेहमान यांनी या क्षेत्रात क्रांती घडविली. एक मात्र खरे की जुन्या-नव्याची सांगड घालून कसलाही पूर्वग्रह न ठेवता संगीत ऐकणारा श्रोतृवर्ग याच काळात तयार होऊ लागला.

एका साध्या गाण्यासाठी या प्रकरणामध्ये लेखकानी गाण्याच्या रेकॉर्डिंगसाठी बदलत्या तंत्रज्ञानाचा आढावा घेतला आहे. संगणकांचा या क्षेत्रात प्रवेश झाला. नवीन सॉफ्टवेअर आले. एक काळ असा होता की दिवसदिवस गाण्याची रिहर्सल होई. वादक रेकॉर्डिंगच्या आदल्या दिवसापासून आपापली वाद्यं घासून-पुसून सज्ज करून ठेवतं. संगीतकार बेचैन असे. गायक पलट्यावर पलटे घेऊन आवाज मोकळा करत बसलेला असे आणि अखेर खुद्द ध्वनिमुद्रणाचा दिवस उजाडत असे. परीक्षेला जाणाऱ्या मुलांसारखीच सगळयांची मनःस्थिती असे. तेव्हाचं मिक्सिंग या गोष्टीवर फारच मोठ्या प्रमाणात अवलंबून असे. जुन्या काळातला ध्वनिमुद्रक आज पुन्हा अवतरला, तर एक संगणक आणि काही सॉफ्टवेअर्स याच्या साहाय्यानं गल्ली बोळात उभे राहिलेले स्टुडिओ आणि तिथली अजागळ कार्यपद्धती बघून अवाक होईल. आजचा संगीतकार कोपऱ्यामधल्या खुर्चीवर व साउंड इंजिनिअर माउसची क्लिक क्लिक करत आज्ञा सोडत असेल.

एकेका वाद्याचे स्वतंत्र ट्रॅक्समध्ये ध्वनिमुद्रण करून त्याचे मनाजोगे मिक्सिंग करण्याचे तंत्र आत्मसात केले गेले. पूर्वीच्या काळची रिहर्सल्स, गायकांच्या चेहऱ्यावरील टेन्शन गायब झाल्या. ट्रॅक्सच्या मिक्सिंगवर अखेरचा हात फिरवून गाणं चमकदार करणारी मास्टरिंग तंत्र विकसित झाले.

त्यामुळे पूर्वीच्या काळच्या रेकॉर्डिंग स्टुडिओ ओस पडू लागल्या. अगदी गल्ली बोळातील एका छोट्या खोलीत, संगणक व इतर साधनांच्या साहाय्यानं गाणे रेकॉर्ड होऊ लागले. हवे तेवढ्या वेळा मनाजोगे गाणे बाहेर पडेपर्यंत संगणकाचा वापर होऊ लागला. त्यामुळे सर्जनशीलतेला मोठा वाव मिळाला. नवे ठोके, नवे बीट्स आले. प्रयोग करण्यास भरपूर वाव मिळू लागला. यातूनच संगीताचा कला ते विक्रीजन्य वस्तू म्हणून झालेला प्रवास हा तोंडात बोट घालायला लावणारा आहे. मोठ्या प्रमाणात पैशाची उलाढाल होऊ लागली. संगीतातील वैविध्यता जाणवू आली. ऑनलाईन व्हिडीओ, रीॲलिटी शोज, गाण्याच्या स्पर्धा, रेडिओ चॅनेल्स, स्वतःचे यूट्यूब शोज इत्यादीमुळे भाऊगर्दी वाढू लागली, स्पर्धा वाढली. व त्यातूनच एखादा तारा चमकू लागला व त्याच्या गाण्याने, संगीताने ऐकणाऱ्यांना अक्षरशः वेड लावले. आताच्या काळच्या काही चमकलेल्या गायक, गायिका व संगीतकार यांच्याबद्दल लेखकानी लिहिले आहे.

अशाच चमकलेल्या ताऱ्यांपैकी ए. आर रेहमान, विशाल भारद्वाज व नुसरत अली फतेखाँ यांचा नंबर अगदी वरचा असेल. रोजा या हिंदी चित्रपटासाठी संगीत दिलेला हा तमिळनाडूच्या ए. आर. रेहमानचे संगीत इतके दमदार होते की बघता बघता त्यानी त्या काळी सिनेसंगीताचे शिखर पादाक्रांत केले. त्याचा हम्मा हम्मा हे गाणे तरुण वर्गात गाजलं. नंतर आलेल्या बॉंबे चित्रपटातील कहना ही क्या या चित्राच्या मधाळ आवाजातील गाण्याने, त्याच्या तालाने अक्षरशः सिने रसिकांच्यावर जादू केली. सुखविंदरसिंगच्या आवाजातील चल छैया छैय्या गाणं ऐकताना त्याच्यातील गहिरेपणा जाणवतो, ताल व ठेका डोक्यात भिनतो. ए आर गातोसुद्धा! रूढार्थाने त्याचा गळा गायकीचा नाही. त्याचे हिंदी शब्दोच्चार चांगले नाहीत. परंतु गाण्यातील शब्दांचा आशय तो रसिकापर्यंत पोचवतो.

हा तरुण संगीतकार त्याच्या स्वतःच्या गाण्यात अडकून न पडता नवीन गाणे शोधतो, नवीन स्वर शोधतो व नाविन्यतेच्या शोधात हरवून जातो. म्हणूनच ऑस्कर पुरस्कार मिळाला तरी तो नम्र व मितभाषीच राहिला. रवींद्रनाथ टागोरांच्या ॲकला चलो रे या गाण्याला मूळ चालीसकट जावेद अख्तरच्या हिंदी शब्दांना त्यानी स्वर दिले. त्याच्याबद्दल वाचताना रेहमान हा एक लोकविलक्षण कलाकार आहे या लेखकाच्या मताशी नक्कीच सर्व सिनेरसिक सहमत होतील.

रेहमानप्रमाणे दक्षिणेतील एम एम क्रीम व हॅरिस जयराज यांच्याविषयीसुद्धा लेखकाचा अभिप्राय चांगला आहे. एम एम क्रीम यानी संगीत दिलेल्या क्रिमिनल चित्रपटातील तुम मिले, दिल खिले हे गाणे रसिकांना नक्कीच आठवत असेल. उज्वल भविष्य असलेला हा एक होतकरू कलाकार आहे. दक्षिणेकडील चित्रपटांसाठी संगीतासाठी तंत्रसहाय देणारा हॅरिस जयराज हा नुसता अरेंजर नसून त्याच्याकडे जबरदस्त तांत्रिक हुकमत आहे. व या क्षेत्रात यशस्वी होण्यासाठी त्याची अत्यंत गरज आहे.

विशाल भारद्वाज हा मूळचा दिल्लीचा. रेकॉर्डिंग मॅनेजर म्हणून तेथील एका स्टुडिओत काम करत होता. स्वतःमधील कलेच्या धुगधुगीला आवरत तो इमाने इतबारे तेथे काम करत होता. त्याला मुंबईतील कामाची एक संधी मिळाली व या संधीचे त्यानी सोने केले. मुंबईत गुलजारची भेट झाली. जंगल बुकचे शीर्षक गीत करण्यास सांगितले गेले. त्यांनी संगीतबद्ध केलेले चड्डी पहनके फूल खिले हैं सुपरहिट ठरले. पुढे यानी संगीत दिलेले मकबूल, माचीस, सत्या, चाची ४२०, गॉडफादरमधील गाणे हिट ठरल्या. विशालचे चप्पा चप्पा चरखा चले आलं तेव्हाच त्याचे वेगळेपण दिसून आले. नंतर तो चित्रपट निर्मितीच्या क्षेत्रात पडला. इश्किया, ओंकारा चित्रपटांची निर्मिती केली. लहान मुलांसाठी 'द ब्ल्यू अंब्रेला' हा पारदर्शी

रंगाचा चित्रपट विशालने आणला. विशालसारखाच दिल्लीहून आलेला अजून एक संगीतकार म्हणजे इस्माइल दरबार. ‘हम दिल दे चुके है सनम’ या भन्सालीच्या सुपरहिट चित्रपटाला त्यानी संगीत दिले होते. भन्सालीच्या 'देवदास'चे संगीतही इस्माइल दरबारचाच होता. 10-15वर्षापूर्वीची त्यातील गाणी अजूनही ताजी वाटतात. यावरून या संगीतकाराची सर्जनशीलता जाणवते.

कव्वाली गायकीला आधुनिक स्वरूप देणारा व सुफी पंथातील गायकीला प्रसिद्धीच्या झोतात झळकविणारा नुसरत अली फतेखाँ हा पाकिस्तानी गायक होता. त्याच्या गाण्यात आर्तता, गूढ उदासीनता होती. सिनेसंगीतात कव्वाली हा प्रकार नवीन नाही. जुने चित्रपट ‘बरसात की रात’, ‘मुघले आझम’, ‘दिल ही तो है’ यातील कव्वाली रसिकांना नक्कीच आठवत असतील. कव्वाली हा आध्यात्मिक अनुभव आहे, असे सूफी पंथाचा दावा आहे. सूफी हा एक गूढ पंथ आहे असे अनेकांना वाटते. संगीताला आद्यात्मिक दर्जा दिलेला हा पंथ आहे. कव्वाली गायकीला अनेक नियमांनी व रूढी परंपरेने बंदिस्त केले होते. नियमांच विस्तारणं, पालटणं, हे अशक्यप्राय काम होतं. ते नुसरतने केलं व साचेबद्ध कव्वालीला मोकळ केलं. साचलेलं पाणी बोळा काढल्यावर जस घळाघळा वाहतं तस कव्वाली गायकीतील चैतन्य नुसरतमुळे वाहू लागले. त्यानी सरगम या संगीत प्रकाराचा कव्वालीमध्ये फार खुबीने वापर केला. ही सरगम त्याच्या गाण्याचे नंतरच्या काळात ट्रेड मार्क ठरले.

नुसरत गाऊ लागतो तेव्हा सगळ्या मैफलीत प्रसन्न वातावरण तयार होत आहे असे वाटू लागते. शेखर कपूरच्या बँडिट क्वीनमधील गाणी नुसरतने म्हटलेले आहेत. त्या गाण्यात त्यानी जीव ओतल्याचे जाणवते. नुसरतच्या सगळ्या कामामध्ये त्याचा वेगळेपणा उठून दिसतो. ए आर रेहमाननं

भारताच्या पन्नासाव्या स्वातंत्र्यादिनानिमित्त सादर केलेल्या वंदे मातरम चे गाणे नुसरतच्या आवाजात रेकॉर्ड केलेले आहे. परंतु हा अवलिया मैफल अर्धवट संपवून वयाच्या 48व्या वर्षी कायमचाच काळाच्या पडद्याआड अंतर्धान पावला. त्याचाच वारसा त्याचा मुलगा राहत अली फतेखाँ व अबिदा परवीन पुढे नेत आहेत.

स्कूल चले हम हे सर्व शिक्षा अभियानासाठी चित्रित केलेले गाणे (गायक कुणाल गांजेवाला) बहुतेकांच्या स्मरणात असेल. जाहिरातीच्या संगीतात एवढी भावगर्भता क्वचितच सापडेल. त्याला तालाचे, सुराचे, वेळेचे व व्यवहाराचे गणित जुळवून आणावे लागते. व ही किमया शंकर महादेवन, एहसान नुरानी, लॉय मेंडोसा या त्रिकुटाने करून दाखविले आहे. यातील शंकर महादेवन, जन्माने चेन्नईचा, व मुंबईत वाढला. टी आर बालामणी यांच्याकडे संगीताचे धडे घेत होता. मुंबईत श्रीनिवास खळे यांचे मार्गदर्शनाखाली तो तयार झाला होता. बघत बघता तो मोठमोठ्या संगीतकारांसाठी गाऊ लागला. हिंदी, मराठी, कन्नड, तमिळ या भाषेतही गाऊ लागला. या त्रिकूटानी 'दस', 'दिल्लगी', 'शूल', 'ब्रॅडफोर्ड' या चित्रपटांचे संगीतकार म्हणून अनेक प्रयोग केले. 'दिल चाहता है'च्या संगीताने त्याना उच्च पदावर पोचविले. कल हो ना हो व 'अरमान'साठी त्यांनी आपली शक्ती पूर्णपणे पणाला लावली. गाण्यानुसार गायक व गायिका निवडत असल्यामुळे गाण्यात वैविध्यता आणण्यात ते यशस्वी झाले. 'बंटी और बबली'लाही याच त्रिकूटानी संगीत दिले होते. गंमत अशी आहे की त्यांनी संगीतबद्ध केलेल्या चित्रपटातील सर्वच्या सर्व गाणी कधीच हिट झाले नाहीत. परंतु प्रत्येकातील एखादं दुसरं गाणं नक्कीच हिट झाले आहेत. त्याचबरोबर त्यानी संगीतबद्ध केलेल्या चित्रपटात प्रयोगशीलता नक्कीच जाणवते. लेखक यांच्याबद्दल भरभरून लिहित आहेत. ते मुळापासून वाचायला हवे.

मधलं सप्तकं या प्रकरणात लेखकानी गेल्या दोन-तीन दशकात यशस्वी ठरलेल्या काही संगीतकारांच्या वैशिष्ट्याचा आढावा घेतला आहे. संगीतकार जतिन-ललित या जोडीने संगीत दिलेले 'कभी हाँ कभी ना' व 'दिवाना' या चित्रपटातील गाण्याने व त्यातील टणाटण वाजणाऱ्या तबल्याच्या ठेक्याने लेखकाला झपाडून टाकले. नंतर आलेल्या 'जो जीता वही सिकंदर' व 'राजू बनगया जंटलमन'मधील गाणीसुद्धा तितकीच गाजली होती. तसे फार अल्पकाळात या जोडीला पुष्कळ यश मिळाले. हे यश त्या काळी इंटरनेट वगैरे काही नसतानासुद्धा मिळाले हे विशेष. चार वर्षामध्ये त्यानी आपला स्वतःचा ठसा या सिनेजगतात उमटविला. नंतर आलेल्या भन्सालीच्या 'खामोशी'मध्ये गोव्यातील लोकसंगीताचा बाज वापरून त्यांना एकजीव केला. त्याचे 'दिलवाले दुल्हनिया..'.मधील गाणे तुफान गाजले. तरुणाईतील जोश, ईर्ष्या, धाकधूक, दगदग, नशा, प्रेमाधील बोल्डनेस या सर्व गोष्टी त्यांच्या संगीतातून व्यक्त होत होत्या. मेरे ख्वाबो में जो आये या लताताईने उतरत्या वयात गायिलेले गाणेसुद्धा अप्रतिम होते. त्यांची गाणी चांगल्या अर्थाने भरकटवतात, या लेखकाच्या मताशी रसिक नक्कीच सहमत होतील. त्यांच्या सुराना धार नाही मात्र गोडवा आहे. ते वळणदार आहेत. माणसांना जोडणारे आहेत. या जोडीला जसराज, सुलक्षणा पंडित यांचा संगीताचा वारसा लाभला होता, हे त्यांच्या संगीतकृतीमधून जाणवते.

याच दरम्यान सांगीतिक वारसा न लाभलेली परंतु तुफान गाजलेली जोडी नदीम-श्रवण यांची होती. यांची गाणी सरळ, सोप्या चालीची, मृदु, तरल, बाळबोध ठेका असलेली होती. ‘आशिकी’, ‘दिल है की मानता नही’, ‘परदेस’ या चित्रपटातील गाणी याची साक्ष देतात. 1990-2000 या दशकभर नदीम-श्रवण यांनी संगीतक्षेत्र व्यापून राहिले. याच सुमारास अनू मलिकचे संगीतही गाजले. विरासत मधील पायले चुन चुन वा

बाजीगरमधील ये काली काली आँखे ही गाणी ऐकताना आपोआप ठेका धरावासा वाटतो, यातच या संगीतकाराचे यश आहे. बप्पी लाहिरीप्रमाणे अनू मलिकने ठसक्याची गाणी दिली व आबालवृद्धांना त्याच्या ठेक्यानुसार प्रत्यक्ष नाचायला लावलं. त्यांनी गाण्यासाठी एखाद्या-दुसऱ्या गायक-गायिकेमध्येच अडकून न पडता अनेक गायक/गायिकांना संधी दिली व गाणाऱ्यांना प्रसिद्धी मिळवून दिली. यांची गाणी त्याकाळी फॅशनेबल गाणी या सदरात मोडत असे. याच सुमारास फॅशनेबल नसलेले दोन संगीतकार उदयास आले – उत्तमसिंग आणि ‘हम आपके है कौन’चे संगीतकार राम-लक्ष्मण. राम-लक्ष्मणमधील राम निवर्तल्यावरसुद्धा विजय पाटील यांनी नाव न बदलता सुमारे ७५ चित्रपट संगीतबद्ध केले. त्यात दादा कोंडके यांचे काही चित्रपटसुद्धा आहेत. . दीदी तेरा देवर दिवाना अजूनही रसिकांच्या लक्षात आहे. दिल तो पागल है मुळे उत्तमसिंगचे नाव सर्वदूर पोहोचले व या संगीतकाराला लोकमान्यता मिळाली. 'दिल तो पागल है' मधील त्याची एकूण एक गाणी गाजली. घोडे जैसी चाल, हाथी जैसी दुम ने इतिहास घडविला. ले गयी ले गयी या गाण्यातील मस्ती, लाडिकपणा अजूनही आठवतो. उत्तमसिंग यांची गायक निवड नेहमीच अचूक असते. चिठ्ठी न कोई संदेस गाण्यासाठी जगजितसिंगची निवड अचूक होती. लेखकानी राजेश रोशन व संदीप चोवटा यांच्याविषयीसुद्धा लिहिले आहे. एक मात्र खरे की या जुने-नवे संगीतकारांनी सिनेसंगीताला एक वेगळ्या वाटेने नेले व पुढच्या पिढीतील संगीतकांराना वाट मोकळी करून दिली.

संगीतनिर्मितीमधील सर्वात महत्वाचे टप्पे गाणे, गाण्यातील शब्द व त्याचे नेमके उच्चारण. संगीतनिर्मिती हे नेहमीच दोन टप्प्यात होत असते. एक संगीतकाराच्या मनात व दुसरी गायक/गायिकेच्या गळ्यात. या दोन्ही बाजू कला या सदरात मोडतात. त्यात सादरकर्त्याचे अनुभव, त्याचे विचार, त्याचे

आचार, त्याचा पिंड, त्याचे बौद्धिक कौशल्य आदि सर्व गोष्टी येतात. त्याचबरोबर तंत्रामधील पारंगतता व रसास्वाद घेणाऱ्याकडील रसग्रहणाचा आवाका या गोष्टी पण येतात. गाणे / संगीत रसिकापर्यंत पोचविणाऱ्या स्पीकरच्या तंत्रज्ञानात अभूतपूर्व प्रगती झाली. स्टिरिओ, ट्रेबल्, वूफर, बास इत्यादीमुळे गुणवत्तपूर्ण निर्मितीत संगीतकार व गायकांची जबाबदारी वाढली रसग्रहणासाठी सिनेसंगीताच्या इतिहासाची पाने उलटल्यास या क्षेत्राला अनेक गायकांनी सर्जनशील गाणी फुलवले आहेत, हे लक्षात येईल. लता, आशा, रफी, तलत, हेमंतकुमार, किशोरकुमार ही नावे व त्यांची गाणी आजही विसरले जात नाहीत. या सगळ्या मंडळींनी कित्येक वर्षे राज्य केले. पण निसर्गाच्या नियमाप्रमाणे जुनं शिळं होत, नवं वाढतं. धक्का देत फाटे फोडत वाढतं, फोफावतं.

अलका याज्ञिक, कविता कृष्णमूर्ती, कुमार सानू, साधना सरगम, उदित नारायण ही मंडळी अत्यंत चिकाटीने व जिद्दीने या क्षेत्रात पाय रोवून उभारले व सिनेसंगीताला वेगळे आयाम देऊ शकले. परंतु त्या कधीही जुन्यांच्या स्पर्धेत गेले नाहीत. नवीन संगीतकारांना जे हवे ते देत आपला एक स्वतंत्र कोपरा शोधून त्यांनी नाव कमावले. आलिशा चिनॉय व शेरॉन प्रभाकरने बाजूचा रस्ता निवडून वेगळी वाट चोखाळली. या कलाकारांनी सुनिधी चौहान, श्रेया घोषाल, शान, सोनू निगम, सुखविंदर सिंग, कैलाश खेर, बेला शेंडे, कविता सेठ, आदींना वाट मोकळी करून दिली.

भारतामधील पार्श्वगायनाची चौकट ओलांडून गेलेले हरीहरन, पलाश सेन, शुभा मुद्गल, अदनान सामी यांनी वेगळा ठसा उमटविला. लता-आशा यांच्या आवाजाच्या प्रारूपाला अलका याज्ञिकने वेगळ्या वळणाने पुढे नेले. अलका याज्ञिकची गाणी वर्षानुवर्ष न कंटाळता, न थकता रसिकापर्यंत पोहोचत राहिली. माधुरी दिक्षितवर चित्रित केलेले एक, दोन, तीन या राम लखन मधील गाणे आजही तितकीच लोकप्रिय आहे. कविता कृष्णमूर्तीचे वेगळेपण 'बाँबे'मधल्या तू ही रे मध्ये दिसले. अनुराधा पौडवालचे दिल है की मानता नही हे गाणंसुद्धा

तितकेच लोकप्रिय आहे. श्रेया घोषाल व सुनिधी चौहान या दोघींचे चाहते भारतभर आहेत.

या गायिकांचे जे विश्व आहे तसेच गायकांचेसुद्धा आहे. नव्वदीच्या दशकात कुमार सानू, सोनू निगम, अभिजित आणि उदित नारायण यानी गाजविला. कुमार सानूचे 'परदेस' मधील दो दिल मिल रहे है वा उदित नारायणचे लगानमधील लोकसंगीतावर आधारलेले ओरे छोरी अभिजितचे 'मुन्नाभाई'मधील एम बोले तो ही गाणी आपण विसरू शकत नाही. लेखकाच्या मते हिमेश रेशमिया हा एक अव्वल दर्जाचा संगीतकार व गायकही आहे. भरपूर वादविवादात तो सापडल्यामुळे माध्यमांनी त्याच्या प्रतिभेकडे फार लक्ष दिले नाही, ही लेखकाची तक्रार रास्त वाटते.

या सगळ्या गायकांनी प्रचंड संख्येने गाणी गायली आहेत. त्यांना ढिगाने पुरस्कारही मिळाले आहेत. एक मात्र खरे की आताच्या काळात नुसते अप्रतिम गाऊन चालत नाही.त्याच बरोबर अनेक हिकमती लढवाव्या लागतात. काळाला ओळखावे लागते. रसिकाच्या बदलत्या आवडी-निवडीचा वेध घ्यावा लागतो. चित्रपट क्षेत्रातील राजकारणाशी टक्कर द्यावी लागते. हे सर्व अंगावर घेण्यासाठी पक्का आवाजाची बावनकशी भांडवल असल्यास सर्व काही निभावता येते. या सर्व नवोदित गायक- गायिका या सर्व प्रोसेसमधून तावून सुलाखून इथपर्यंत पोहोचले आहेत हे आपण विसरता कामा नये. संगीताचे वाढणारे रूप कधी आनंददायी असते तर कधी धडाडी भरविणारी असते. त्यामुळे आजकाल कित्येक गायक सिनेक्षेत्राबाहेर जावून नाव कमवत आहेत. हरीहरनसारखा प्रयोगशील गायक नव कोरं संगीत घेऊन प्रसिद्धी मिळवत आहे. मोहित चौहान हा स्वतःचा बँड घेवून अल्बम काढत आहे. त्याच्याकडे स्टायलिश् आवाज आहे, असे लेखकाला वाटते. शोभा मुद्गल यांनी आपल शास्त्रीय संगीत रॉकशी, पॉपशी जोडत आहे. असे अनेक प्रयोग होत आहेत व रसिकांची पावती मिळवत आहेत.

मराठी पाऊल पडते पुढे या प्रकरणात लेखकानी मराठी सिनेसंगीताचा लेखाजोखा व भविष्यात अवधूत गुप्ते, मिलिंद इंगळेसारख्या नवोदित मराठी कलाकारांची झेप काय असेल याचे वर्णन केले आहे. हे सर्व मुळापासूनच वाचायला हवे.

लेखकानीच उल्लेख केल्याप्रमाणे माणसाला पूर्वी पहिल्यांदा गाणं कधी भेटलं असेल ते असो, पण आजच्या घडीला गाण्यानं माणसाचा पिच्छा पुरवला आहे. उठता-बसता, खाता-पिता, न्यू इअर ते ख्रिसमस, कॉलेज ते दवाखाना, लग्न समारंभ, यात्रा-जत्रा. कुठेही जा, केव्हाही जा, गाणं आपल्याभोवती फेर धरून नाचत आहे. आपली इच्छा असो वा नसो, आपली पसंती असो वा नसो, सुरांचा एकच मारा चारी दिशांनी होताना दिसत आहे. आता ही जी सारी वैविध्यं आढळून येत आहेत, ती सगळी एकजात छान असतील असे नव्हे. पण एकूण संगीत पुढे जाण्याच्या दृष्टीने फारच महत्वाची आहेत. त्या विविधतेला पुरा पडणारा संगीतकार विरळाच, म्हणून मग अशी उमदी कलाकार मंडळी ग्रुप तरी करतात किंवा दोघांच्या जोड्या बनतात. त्या ग्रुपमध्ये एक किंवा अनेक अरेंजर्स असल्याने त्यांच्या चालीमध्ये, सादरीकरणामध्ये निराळेपण येतं. ग्रुपमध्ये कसलं चैतन्य असतं तसलचं चैतन्य त्यांच्या संगीतात आढळतं.

संगीत ही माणसाची गरज आहे. प्राथमिक स्वरूपाची नसली तरी. ती नैसर्गिक आहे याचा प्रत्यय पुस्तकाची पाने उलटताना होतो. हीच लेखकानी घडवून आणलेल्या सिनेसंगीत कलाप्रवासाची खरी पावती ठरेल. गाणी मोबाइलवर असतात. कदाचित तो चिरका आवाज खऱ्या आवाजाला न्याय देत नसेलही. त्यामुळे खऱ्या रसिकाचा, खऱ्या गायकाचा प्राण घुसमटेल. परंतु या भोवऱ्यातून जो धैर्यानं वाट काढेल त्याचे भाग्य उजळून जाईल हे मात्र खरे.

**नवे सूर अन् नवे तराणे संगीतआजच्या काळाचं**

*डॉ. आशुतोष जावडेकर,*

राजहंस प्रकाशन,

किंमतः 200 रु, पृ.सं 176



# ज्ञानाची आस असलेले नंदा खरे

नंदा खरे गेले यावर क्षणभर विश्वास बसत नाही. कारण अगदी अलिकडे त्यानी लिहिलेले "धिस इज हाऊ दे टेल मी द वर्ल्ड एण्ड्ज"  (लेखिका निकोल पर्लरॉथ, प्रकाशक ब्लूम्सबरी, २०२१) या पुस्तकाचे ‘‘एक नवच शस्त्र’ परीक्षण वाचत असताना त्यांची ज्ञानाविषयी असलेली उत्कंठा, नवीन काही वाचत असल्यास  त्याबद्दल लिहिणे व ते वाचकापर्यंत पोचविणे, त्याविषयातील खाचा-खोचा समजून देणे, विनोदी अंगाने मल्लीनाथी करणे इत्यादी गोष्टी पटकन लक्षात आल्या.  त्यांच्या मते काही संकल्पनांचा मुळातून पुनर्विचारही करावा लागणार आहे उदा:  देश-राष्ट्र, खाजगी-जाहीर, नैतिक-अनैतिक, इ.इ. आज संगणकशास्त्र, माहिती तंत्रज्ञान वगैरे विषयांच्या अभ्यासक्रमांत नीतिशास्त्र शिकवतात म्हणे; पण काही घटनांनंतर नेमकं काय शिकवलं जातं याचीही जाहीर चर्चा व्हावी, असे त्यांना वाटते. नंदा खरेंच्या मते सैन्य बाळगणे हा देशांचा लक्षणगुण झाला आहे; हेरगिरीला ऊत आला आहे; शस्त्रं आणि त्यांच्या 'प्रणाली'चे पीक वाढत आहे; इंटरनेट जग व्यापत आहे.  त्यामुळे पत्रांद्वारे दिलेल्या संदेशांना  विजेचे पंख मिळत आहेत; पत्र-पाकीटं व टेलिग्राम मृत्युपंथास टेकले आहेत; दृक्‌श्राव्य आवृत्त्यांनी (स्काईप, झूम, इ.) सभा, सभागृहं वगैरेंना हद्दपार केले आहे; 'ऑनलाईन'  शिक्षणच खरे शिक्षण हा समज दृढ होत आहे. समाजाचं 'आहे रे / नाही रे' अशी दुभंगलेली अवस्था झाली आहे, असे त्यांना वाटते.

नंदा खरे यांचा परिचय विवेकवादाला वाहिलेल्या आजचा सुधारक (आसु) या मासिकामुळे झाला. तानाजी खिलारे आणि मी मिळून आसुच्या तथाकथित ब्राह्मण्याविषयी एक पत्र लिहिले होते. त्यात आसुच्या लेखकांच्या  व सदस्यांच्या आडनावावरून ‘आसु हे मासिक उच्चवर्णीयानी, उच्च वर्णीयांसाठी छापत असलेले मासिक’ असा निष्कर्ष काढला होता. खरे

पाहता त्या मासिकाबद्दल टीका करणारे आमचे पत्र न छापता केराची टोपली दाखविली असती तरी फार फरक पडला नसता. परंतु आसुने ते पत्र छापून भरपूर चर्चा घडवून आणली. या निमित्ताने नंदा खरे यांची ओळख झाली व आम्हा दोघानाही त्यांनी सल्लागार मंडळावर घेतले. नंतरच्या काळात जात-आरक्षण या विशेषांकासाठी अतिथी संपादक म्हणून आम्हाला संधी दिली. कुठलेही काट-छाट न करता हा अंक छापला गेला. या अंकाबद्दल उलट-सुलट प्रतिक्रिया आल्या. परंतु कार्यकारी संपादक म्हणून नंदा खरे खंबीरपणे आमच्या पाठीशी उभे राहिले. त्यांचा आणि आमचा परिचय वाढला. एखादे चांगले पुस्तक त्यांच्या वाचनात आल्यास त्याबद्दल आसुत लिहिण्यास ते सांगत असत. त्यामुळे माझ्यासारख्याला नवीन नवीन गोष्टी कळू लागल्या.

कार्यकारी संपादक म्हणून आसुतील लेख निवडताना शेती, माती, पाणी, नगर रचना, तत्त्वज्ञान, मानसशास्त्र, अर्थशास्त्र, इतिहास, उत्क्रांती, विज्ञान-तंत्रज्ञान इत्यादी विविध विषयावरील लेख छापण्याकडे त्यांचा कटाक्ष होता. त्यामुळे आसुत एका प्रकारे ज्ञानशाखांचा संगम दिसत असे. त्यांची ‘ज्ञाताच्या कुंपणावरून’, ‘2050’, ‘अंताजीची बखर’, ‘संप्रती’, ‘जीवोत्पत्ती ‘दगडावर दगड विटेवर वीट’, ‘नांगरल्यावीण भुई’, ‘कहाणी मानव प्राण्याची’, ‘बखर अंतकाळची’, इत्यादी पुस्तकं वाचताना, अनेक दिशांनी जगाचं दर्शन होतं. विषयातील विविधतेमुळे त्यांचा आवाका लक्षात येतो. ते आपल्याला अनेक गोष्टींचा उलगडा करून दाखवतात. कारण त्यांना मुळात आतून कुतूहल आहे, समजून घेण्याची आस आहे. मग ते ‘जीवोत्पत्ती आणि नंतर’ असेल किंवा ‘कहाणी मानव प्राण्याची’ सारखा अतिशय महत्त्वाचा मोलाचा ग्रंथ. त्यांच्या पुस्तकातून ते वाचकाला मुळापर्यंत घेऊन जातात. ‘अंताजीची बखर’मधून इतिहासाकडे तटस्थपणे पहाण्याची नजर देताना त्यांची विनोदबुद्धी मनापासून खुलून जाते.

ते संगणक तज्ञ नव्हते; परंतु संगणक तंत्रज्ञानातील सर्व धोक्यांची कल्पना त्यांना होती. ते इतिहासकार नव्हते; परंतु पूर्वीच्या काळातील सर्व काळया धंद्यांची कल्पना त्यांना होती. ते मानववंशशास्त्रज्ञ नव्हते; परंतु ‘कहाणी मानव प्राण्याची’ या पुस्तकातून मानव प्राणी कसा घडला याचे दर्शन ते घडवू शकले. नंदा खरे यांची पुस्तकं अत्यंत वेगळया प्रकारची आहेत व त्या पुस्तकांत कुठल्याही प्रकारचे मनोरंजन, स्वप्नरंजन वा स्मृतिरंजन हा प्रकार नसतो.

इतिहास/वर्तमानकालीन प्रसंगांचा खुबीने वापर करून आपल्या ताटात पुढे काय वाढून ठेवले आहे, याची सतत आठवण करून देत भविष्यवेध घेण्याच्या प्रयत्न ते नेहमी करत.  विषमतेचे आणि हवामानबदलाचे धोके ते अधोरेखित करत होते. 'सत्य दाबून ठेवण्याचा प्रकार सर्वकाळात कमी-जास्त प्रमाणात सुरुच असतो. प्रत्येकवेळी कुणी तरी खरे बोलण्याची गरज असते. जोपर्यंत सत्य बोलत राहण्याची गरज आहे, तोपर्यंत मी लिहित राहणार आहे,' अशा भावना नंदा खरे यांनी एके ठिकाणी बोलून दाखविले.  व त्याप्रमाणे आयुष्यभर वागलेसुद्धा.

अलीकडेच मी त्यांना एका इ-मेल द्वारे पत्र लिहिले होते. त्यातील मजकूर असा होताः ‘आजच मी आपले पुस्तक ‘ऐवजी’ वाचून संपविली. भरपूर मजा आली. स्मरणरंजनाचा असाही उपयोग करता येतो, हेही लक्षात आले. Born with golden/silver spoon असूनसुद्धा तुमचे पाय जमीनीवर होते/आहेत, हे पुस्तक वाचत असताना प्रकर्षाने जाणवले. अपघाताने आपल्याशी झालेल्या ओळखीचा पुरेपूर आनंद घेऊ शकलो नाही याचे फार वाईट वाटले.

माझाही  जॉन स्टाइनबॅक हा आवडता लेखक. व त्याच्या गाजलेल्या Grapes of wrath व  East of Eden पेक्षाही तुमच्या

प्रमाणे Winter of our discontent मला फार आवडलेले पुस्तक. इथन/मार्गी यांना मी कधीच विसरू शकत नाही. (इतर वाचकाप्रमाणे मलाही संप्रती वाचताना Winter of our discontentशी संबंध जोडता आला नाही. कदाचित मार्गीचा इनोसेन्स मला त्यात दिसला नसेल.) रेन मार्टिन यांच्या इंग्रजी ग्रामर बरोबरच तर्खडकर भाषांतरमालासुद्धा माझ्या मोडक्या तोडक्या इंग्रजी शिक्षणाला हातभार लावला होता. पावकी, औटकी, रामरक्षा, परवचा हे सर्व सांस्कृतिक सोपस्कार आमच्यावरही झाले होते.  कॅथरीन मान्सफील्डचा संबंध 'अ कप ऑफ टी' या कथेपुरताच सीमीत राहिला. कास्टीचा Paradise regained हे पुस्तक आवडले होते. Alan Turing वर एक प्रदीर्घ लेखही मी लिहिला होता. असो.

पत्रास मुख्य कारण की मी आजकाल बेळगाव येथे आहे. तुमचे मुनवळ्ळीशी असलेले नाते, व त्याबद्दल आपण केलेले वर्णन आवडले.  जनरल श्रीकृष्ण सरदेशपांडे हल्ली धारवाड येथे आहेत. (त्यांचा भाऊ दिलीप देशपांडे हे माझे मित्र दिलीप कामत यांचे वर्गमित्र. (दिलीप देशपांडे मुनवळ्ळीहून सवदत्तीला घोड्यावरून शाळेला यायचे म्हणे!) माझी आपल्याला अशी विनंती आहे की आपण (पत्नी विद्यागौरीसह) वेळ काढून माझ्या येथे मुक्कामासाठी दहा-पंधरा दिवसासाठी येणे. (फक्त जमीनीवर झोपायची तयारी हवी!) मग आपण मुनवळ्ळी, नवीलतीर्थ, सोगल, धारवाड अशी फेरी मारू. अळ्ळीट्टू, तंबिट्टू (तंबिट्टीन लाडू नव्हे), तोक्कू, मंडिगी, कुंदा, धारवाड पेढे, गोकाक करदंटू, गोदी हुग्गी, हुळ्ळानुच्चु यासारख्या कर्नाटकी पदार्थाची चव घेऊ. तुम्हाला आपल्या बालपणाची नक्की आठवण येईल. गप्पा होतील, (टिंगल टवाळी करता येईल.) बघा कसे जमेल ते. जनरल सरदेशपांडेनाही आपले अचानक येणे नक्कीच आवडेल. ही आग्रहाची विनंती. (कृपया वयाची सबब सांगू नये!)'

परंतु वेळ निघून गेली होती. आजारपणामुळे त्यांच्यावर उपचार चालू होते. त्यांच्या मनात असूनही ते माझी इच्छा पूर्ण करू शकले नाहीत, याची मला फार हळहळ वाटते.

जेव्हा ते पुण्यात येत असत तेव्हा ते आवर्जून भेटत होते. सुधीर बेडेकर आमचे मित्र होते. चर्चेसाठी विषयांची कमी नव्हती. सुधीर बेडेकरांच्या मृत्युनंतर त्यानी एक मृत्युलेख लिहिला होता. ते वाचल्यानंतर मी 'फारच छान मृत्युलेख...

(अशाच प्रकारचा माझाही  मृत्युलेख लिहित असाल तर आजच माझी मरायची तयारी आहे... )' असे कळविले होते. त्याला 'जियो मेरे लाल!  आता ना मला चालता येत आहे, ना सोबत सुधीर आहे. कॉफीची टपरी, हेच शाश्वत सत्य! अधूनमधून खिडकीतून (windows !) हात काढून हॅलो म्हणत राहू!'  असे उत्तर त्यांनी पाठविले होते. त्यांचे  हे शब्द सतत आठवणीत राहतील.



# आल्फ्रेड हिचकॉक यांचे 'थर्टी नाइन स्टेप्स'

Thirty Nine Steps/Dir: Alfred Hitchcock/ Britain /1935/100 minutes/B&W



प्रेक्षकांना आकर्षित करण्यासाठी व त्यांची मनं रिझविण्यासाठी चित्रपट व्यवसायाच्या अगदी प्रारंभीच्या काळापासून प्रयत्न केले जात होते. जेव्हा चित्रपट मुके होते तेव्हासुद्धा देहबोली, मूकाभिनय (व माकडचेष्टा!) करत प्रेक्षकांना एका वेगळ्या जगात हे मूकचित्रपट घेऊन जात होते. मूकचित्रपटातील आशय समजून देण्यासाठी चित्रपटाच्या अधे-मधे वाक्यं लिहिलेले पाट्यासुद्धा झळकत होत्या. व हे वाक्य लिहिणेसुद्धा येरा गबाळाचे काम नव्हते.

जेव्हा चित्रपट बोलू लागले तेव्हा तर प्रेक्षकांचे मनोरंजन करण्यासाठी आकाश मोकळे झाल्यासारखे या क्षेत्रातील व्यावसायिकांना वाटू लागले. हास्य चित्रपटाबरोबरच अद्भुतरम्य चित्रपटांची सद्दी आली. या अद्भुततेला

कोंब फुटल्यासारखे प्रेक्षकांना खिळवून टाकणाऱ्या भयपटांनीसुद्धा चित्रपटसृष्टीला फार मोठे योगदान दिले. ज्या प्रकारे चार्ली चॅप्लिनसारख्या प्रतिभावंताचे नाव हास्यचित्रपटांच्या संदर्भात घेतले जात होते त्याचप्रकारे ‘थर्टी नाइन स्टेप्स’ या अप्रतिम चित्रपटाचे दिग्दर्शक ऑल्फ्रेड हिचकॉकचे नाव भयपटांच्या संदर्भात घेतले जाते. केवळ भयपटच नव्हे तर, पलायनवादी चित्रपटांची मुहूर्तमेढ हिचकॉकनीच रोवली असेही म्हटले जाते. चित्रपटाची भाषा काय करामत करून दाखवू शकते याचे पूर्ण ज्ञान असलेल्या या दोन्ही फिल्म मेकर्सनी एक काळ गाजविला होता हे आपण विसरू शकत नाही. अती सामान्य वाटणाऱ्या प्रसंगांतूनच अद्भुततेचा आभास देणाऱ्या त्यांच्या कलाकौशल्याचा जितके कौतुक करता येईल तेही कमी वाटेल. एवढेच नव्हे तर काही विशेष प्रसंगांची निर्मिती करून प्रेक्षकांची मती गुंग करण्यात हे दिग्दर्शक आपल्यातील सर्जनशीलतेची चुणुक त्याकाळी दाखवत होते.

1897मध्ये इंग्लंडमध्ये जन्मलेला हिचकॉक काही काळ जर्मनीतील एका स्टुडिओमध्ये चित्रपटविषयक प्रशिक्षण घेऊन मायदेशी परतला. 1926मध्ये त्यानी त्याचा पहिला-वहिला चित्रपट ‘ब्लॅकमेल’ या चित्रपटाचे दिग्दर्शन केले. मूकचित्रपट म्हणून या चित्रपटाची शूटिंग चालू करत असताना चित्रपटाला शब्दांची जोड देण्याचे तंत्र नुकतेच उपलब्ध झाल्यामुळे हिचकॉकचा हा चित्रपट इंग्लंडचा पहिला बोलपट म्हणून गणला जातो. 1924 ते 1938 या काळात त्यांनी सहा चित्रपटांची निर्मिती केली. या सहा चित्रपटात 1935 साली दिग्दर्शित केलेला ‘थर्टी नाइन स्टेप्स’ हा चित्रपट आहे. 1939मध्ये त्यांनी इंग्लंडहून अमेरिकेला स्थलांतर केल्यानंतर पुढील सर्व चित्रपट अमेरिकेतच निर्माण झालेले आहेत. अमेरिकेतील त्याचे चित्रपट अवाढव्य खर्च करून तयार केलेले आहेत. परंतु ‘थर्टी नाइन स्टेप्स’ मात्र

कमी खर्चात असूनसुद्धा हिचकॉकच्या इतर गाजलेल्या सर्व चित्रपटातील वैशिष्ट्यं असलेली ही कलाकृती आहे.

थर्टी नाइन स्टेप्स हा चित्रपट 1915साली प्रकाशित झालेल्या जॉन बुचन या लेखकाच्या साहसी कथेवर बेतलेला आहे. यात त्याकाळचे आघाडीचे नट रॉबर्ट डोनट व नटी मॅडेलिन कॅरोल यानी काम केले आहे. डोनट कॅनडाहून लंडनला काही दिवसासाठी येतो. एका थिएटरमध्ये ऑर्केस्ट्राबरोबर काही मजेशीर खेळ दाखविले जात असतात. तेथे तो खेळ बघण्यासाठी जातो. स्टेजवर एक जण प्रेक्षकांनी कुठलेही प्रश्न विचारले तरी ताबडतोब उत्तर देणारे मेमरीचा खेळ तो बघत असतो. हे चालू असताना पिस्तूल झाडल्याचा आवाज आल्यामुळे प्रेक्षक सैरावैरा इकडे-तिकडे पळू लागतात. डोनटच्या शेजारी असलेली एक महिला त्याला एका रात्रीसाठी त्याच्याकडे मुक्काम करण्याची विनंती करते. कारण विचारल्यावर ती एक गुप्तहेर असून इंग्लंडमधील गुप्त कागदपत्रे चोरणाऱ्या दुसऱ्या एका गुप्तहेर टोळीचे गुप्तहेर तिच्या जीवावर उठलेले आहेत, असे ती सांगते. तो तिला घरातील एका खोलीत आश्रय देतो. गप्पांच्या ओघात या स्पाय टोळीचा मुख्यस्थ स्कॉटलंडमध्ये आहे असे ती सांगते. परंतु मध्यरात्रीच्या सुमारास ती घाबरत, घाबरत थर्टी नाइन स्टेप्स.... करंगळी तुटलेला... असे म्हणत जीव सोडते. कारण तिच्या पाठीत कुणीतरी चाकूने भोसकलेले असते. डोनट घाबरून पोलीस व तिचा खून केलेले गुप्तहेर यांच्यापासून लांब पळून जाण्यासाठी एका खेड्यात लपून राहण्यासाठी जातो. रेल्वेतून प्रवास करत असताना मारेकरी डब्यात चढतात. त्यांना चुकविण्यासाठी एका कुपीत शिरतो व तेथे एकटीच प्रवास करत असलेल्या मॅडेलिनमुळे तो वाचतो. व तो त्या गुप्तहेरांच्या तावडीतून सुटून एका मोठ्या घरापाशी जातो. तेथे पार्टी चालू असते. हाही एक गेस्ट समजून त्याला खायला प्यायला दिले जाते. त्या

पार्टीचा यजमान त्याच्याबद्दलची माहिती काढून घेतो. एका निसटत्या क्षणी हा यजमान त्याला आपले हात दाखवत असताना त्याची करंगळी तुटलेली आहे, हे त्याच्या लक्षात येते. हाच गुप्तहेरांचा मुख्यस्थ असावा असे संशय आल्यामुळे तो तिथून पळ काढतो. त्याच गावातील एका शेतकऱ्याला रात्रीपुरते राहण्यासाठी जागा मागतो. हा शेतकरी फार संशयखोर असतो. त्याची बायको डोनटबरोबर पळून जाईल म्हणून तो पाळत ठेवतो. रात्री बायको काही निमित्ताने त्याच्याशी बोलत असताना तो पोलीस स्टेशनला फोन करतो. बायको त्याला तेथून निसटून जाण्यासाठी मदत करते. नवऱ्याचा जाडजूड कोट देऊन त्याला मागच्या दरवाज्याने पाठवते. तरी शेवटी मारेकरी त्याला गाठतात व त्याच्यावर गोळी झाडतात. परंतु ती गोळी खिशातील त्या शेतकऱ्याने ठेवलेल्या बायबलमधील प्रार्थनेच्या पुस्तकाला लागलेली असते. त्यामुळे तो वाचतो. पोलीस त्याच्यावरील खुनाच्या आरोपामुळे त्याला जेलमध्ये कोंडून ठेवतात. हा तेथून एका हातात बेडी घातलेल्या अवस्थेत निसटतो. त्याची गाठ रेल्वेच्या डब्यातील त्या तरुणीशी पडते. तो तिला आपण निरपराधी आहोत हे पटविण्याचा प्रयत्न करतो. तिला व त्याला पोलीस पकडून नेतात. वाटेत हिमवर्षावामुळे त्यांच्या गाडीला अपघात होतो. डोनट त्या तरुणीला घेऊन पळून जातो. पिस्तूलचा धाक दाखवून एका हॉटेलमध्ये नवरा-बायको म्हणून दोघे तेथे राहतात. परंतु तेथेही मारेकरी पोचल्यामुळे तेथून दोघेही पळून जातात. तिला त्याच्यावर विश्वास बसतो. व त्या महिलेच्या खुनाचा आळ आपल्यावर येऊ नये म्हणून ते दोघेही शोध घेण्याचे ठरवतात.... अशा प्रकारे पुढे चित्रपट सरकत सरकत सुखांतापर्यंत पोचतो.

हिचकॉक ह्याच्या चित्रपटांचा केंद्रबिंदू खून किंवा हेरगिरी असा होता. त्यांत लबाडी, कपट, फसवणूक यांबरोबरच गैरसमजुतीतून उद्भवणारे प्रसंग

आणि गुंतागुंतीच्या कटकारस्थानांनी गोवलेले कथानक असे. रहस्य तीव्रतर करून अखेरपर्यंत प्रेक्षकाला त्यात गुंतवून ठेवण्याचे अप्रतिम तंत्र त्याला साधले होते. यासाठी तो छायाचित्रणात नवीन उपक्रम व तंत्रांचा वापर आणि परिणामकारक ध्वनिमुद्रण (विशेषतः आवाजाचा पट्टा कमी-अधिक) करीत असे. कधीकधी त्याला ओढून ताणून आणलेल्या विनोदाची झालर आणि प्रासंगिक भेसूर गुंतागुंतीच्या दृश्यांची जोड असे. धक्कातंत्र वापरून प्रेक्षकांची उत्कंठा वाढवत असे. याच चित्रपटात अर्धे-अधिक चित्रपट संपत असताना मुख्य नटच गोळी लागून मरतो. अशा प्रकारच्या धक्कातंत्रामुळे प्रेक्षक खुर्चीला खिळतो व पुढे काय होणार याची वाट बघू लागतो.

हिचकॉक ह्याच्या चित्रपटांतील कथानकात प्रामुख्याने तीन विषय-प्रकार आढळतात. एक, साधारणपणे सर्व चित्रपटांत आढळणारा विषय म्हणजे एखाद्या निष्पाप व्यक्तीला गैरसमजुतीच्या घोटाळ्यात अडकवून त्याची ससेहोलपट करून अखेर तो सच्चा माणूस म्हणून सादर करणे. दोन, अपराधी स्त्री मुख्य नायकाला जाळ्यात अडकवून एकतर त्याचा नाश करते (वा त्याला संपविते) किंवा तिला तो गुन्हेगारी जगतातून बाहेर काढून वाचवितो आणि तीन, मानसिक संतुलन बिघडलेल्या व्यक्तींवर आधारित बेतलेले कथानक.

हिचकॉक याने दि लेडी व्हॅनिशेस (1938), रेबेका (1940), स्पेलबाउंड (1945), दि मॅन हू न्यू टू मच (1956) व्हेर्टिगो (1958), नॉर्थ बाय नॉर्थवेस्ट (1959), सायको (1960), दि बर्ड्स (1963), मॅर्नी (1964) फ्रेंझी (1972) इत्यादी पन्नासहून अधिक रहस्यमय चित्रपटांचे दिग्दर्शन केले व सुमारे 200 दूरदर्शनवरील मालिकांची निर्मिती केली. ऑक्टोबर 1955 मध्ये 'आल्फ्रेड हिचकॉक प्रेझेंट्स’ ही त्याची मालिका अमेरिकेत दूरदर्शनवर अतिशय गाजली. त्याने त्याच वर्षी वीस दूरदर्शन मालिका तयार केल्या. त्यांतून स्वतः भूमिका केल्या.

कॅलिफोर्नियातील बेल एअर येथे त्याचे 1980 साली निधन झाले.

# चार्ली चॅप्लिन दिग्दर्शित ‘मॉडर्न टाइम्स’

*Britain/Silent/B&W/35 mm/70 min/Dir: Charlie Chaplin*



चित्रपट व्यवसायाच्या सुरुवातीच्या काळातील मायावी चित्रपटसृष्टीत वयाच्या 24व्या वर्षी प्रवेश केलेल्या चार्ली चॅप्लिन यानी स्वतःच्या देहबोलीच्या विशिष्ट शैलीतून  मूक चित्रपटांची हास्य-विनोदाला केद्रस्थानी ठेवणाऱ्या  एका नवीन संप्रदायाची प्रथा सुरु केली. 1913 पासून 1970 पर्यंतचा चित्रपटसृष्टीतील त्याचा वावर अविस्मरणीय होता. 1914  साली त्याचा पहिला चित्रपट पडद्यावर आला – ‘Making a Living’ नावाचा, तर 1967 साली त्याचा शेवटचा चित्रपट आला – ‘A Countess from Hong Kong’. त्याने एकूण 82 चित्रपट बनवले. त्यातले 77 मूकपट होते, तर 5 बोलपट होते.

हा मूकपटांमध्ये अभिनय करणारा इंग्लिश फिल्ममेकर अभिनेता, दिग्दर्शक व संगीतकारही होता. विनोदी ढंगाच्या मूकाभिनयासाठी त्याची विशेष ख्याती होती. अभिनयासोबत तो मूकपटांचे लेखन, दिग्दर्शन सांभाळत

असे, तसेच संगीतही रचत असे. पहिल्या महायुद्धाच्या अगोदरच्या काळात तो जगभरातल्या सर्वांत प्रसिद्ध सिनेताऱ्यांपैकी एक होता.

चित्रपटांचा तो सुरुवातीचा काळ होता. त्या काळी युरोप वा अमेरिकेमध्ये लोकांचे करमणुकीचे साधन म्हणजे गल्ली-बोळातील थेटरमधील नाच-गाणी, हास्य-विनोद, कुचाळक्या-चेष्टा अशा धमाल करणाऱ्या गोष्टीं. म्युझिक हॉलमध्ये अनेक अप्रसिद्ध, गरीब कलावंत आपली कला, गाणी, नाटक, एकपात्री प्रयोग सादर करत आणि उपजीविका चालवत. त्यामुळे मूक चित्रपटातसुद्धा लोकांचे क्षणिक मनोरंजन करणाऱ्या हास्य प्रसंगाची लयलूट होती. पाठलाग करणाऱ्या, पळता पळता घसरून भुईसपाट होणाऱ्या, तोंडावर चिखल, आयस्क्रीम वा केक फेकून मजा बघणाऱ्या, पृष्ठभागावर लाथ मारणाऱ्या, चित्र-विचित्र हावभाव करणाऱ्या प्रसंगांची रेलचेल होती.

चॅर्ली चॅप्लिनसुद्धा अशाच प्रकारचे भूमिका करत असताना त्याला त्याच्या आयुष्यातलं सर्वांत प्रभावी पात्र सापडलं, तेच ते वेंधळ्या चार्लीचं... ज्यात तो पडतो, धडपडतो, त्याच्यावर काही ना काही आदळतं किंवा तो कोणावर तरी आदळतो. हसवणारं पण आतून सहृदय, परोपकारी. विचित्र वाटणारे कपडे घातलेलं. छोटी बोलर टोपी आणि मोठाले बूट, काठी आणि फेंगडी चाल. ढगळ विजार आणि तंग कोट, फाटका विटलेला शर्ट आणि बेंगरूळ वाटणारा टाय आणि मुख्य म्हणजे आखूड मिशा. हे विचित्र रसायन लोकांना फारच भावलं. हिटलर आणि चार्ली चॅप्लिन यांच्यात एक समानता आहे. दोघांच्या पण मिशा सारखे होते. पण हिटलरला पूर्ण जग घाबरत असे. आणि चार्ली चॅप्लिन, लोकांमध्ये असलेली भीती संपवून त्यांना भरभरून हसवत होता.

चार्ली चॅप्लिनचे सुरुवातीचे चित्रपट अशा गल्लाभरू मसाल्याने भरलेली असली तरी याच देहबोलीचा वापर करून त्यानी प्रेक्षकांना विचार करण्यास

प्रवृत्त करणाऱ्या चित्रपटांची निर्मिती केली. हास्याच्या मागे दडलेल्या करुणेचे, मानवीयतेचे दर्शन त्यानी घडविले. हसवता हसवता समाजातील दोषांवर बोट ठेवत प्रेक्षकांना अंतर्मुख करण्यास तो प्रेरित करत होता. 1925 साली प्रदर्शित झालेल्या Gold Rush हा चित्रपट पाहून  हा उत्कृष्ट कलाकृतीचा निर्माता आहे अशी प्रशंसा विमर्शक करू लागले. त्याच्यातील सामाजिक प्रश्नांचे प्रत्यक्ष/अप्रत्यक्ष जाणीव त्याच्या चित्रपटात दिसू लागल्या. करोडोपती, बेवारशी, आंधळी मुलगी, श्रीमंताघरच्या महिला, रस्त्यावरील भुके कंगाल भटके, हडकुळी कुत्री यांच्यावरील प्रसंगासोबतच कामगार, कारखान्यांचे मालक, सैनिक, सैन्याधिकारी व राजकारणी यांच्याभोवतीचे प्रसंग त्याच्या चित्रपटात ठळकपणे दिसू लागले. हा बदल कदाचित त्याच्या वैयक्तिक जाणिवेतूनही आली असण्याची शक्यता नाकारता येत नाही. अशा प्रसंगातील व्यंग्य व कणव यांचे मिश्रण बघत असताना तो समस्यांचे सुलभीकरण करत आहे की काय असाही संशय येऊ शकतो. ‘मॉडर्न टाइम्स’ हा चित्रपट त्याच्या बदलत असलेल्या जाणिवांचे एक जिवंत उदाहरण ठरू शकेल.

‘मॉडर्न टाइम्स’ हे चित्रपट शीर्षकच सुचविल्याप्रमाणे ही एक ‘आधुनिक’ काळाची कथा. विसाव्या शतकाच्या प्रारंभीच्या दशकात  (त्या काळच्या) आधुनिक तंत्रज्ञानाचा नुकताच प्रवेश झाला होता. तथाकथित स्वयंचलित मशीन्स, मशीन्सवर नजर ठेवणारे कॅमेरा, कामाची काटेकोर विभागणी, वेळेला दिलेले महत्व, कामगारावर नजर ठेवणारे मॅनेजरच्या ऑफीसमधील स्क्रीन, ऑफिसमधूनच माइकवरून ऑर्डर सोडणारा मॅनेजर इत्यादींनीयुक्त अशा आधुनिक कारखान्यात चार्ली एक यःकश्चित कामगार. सरकत्या बेल्टवर वेगाने येणाऱ्या प्लेटवरील बोल्ट हातातील स्पॅनरने निर्दिष्ट वेळेत टाइट करण्याचे त्याचे काम. टाइट करण्यास थोडासा उशीर झाला तरी प्लेट

तसेच पुढे सरकण्याची भीती. त्या अजश्र यंत्रात अडकण्याची भीती. त्यामुळे चार्लीला या कामाची इतकी सवय झालेली असते की बोल्ट समोर नसले तरी रिकाम्या हातांनी फिरवल्याचा हातवारे तो करत असे. त्याची एखादी चूकसुद्धा भयंकर गोधळाला कारणीभूत ठरत असे.

त्या कारखान्यातील कामगारांचा  लंचटाइमचा वेळ कमी करून उत्पादन वाढविण्यासाठीच्या एका यंत्राची प्रात्यक्षिक करायचे होते. त्या प्रात्यक्षिकासाठी चार्लीची निवड होते. हात न लावता तोंडासमोर येणाऱी बशी, तोंडात घास भरविणारे कृत्रिम हात, दर घासाला तोंड पुसणारे यांत्रिक टॉवेल अशा या यंत्रासमोर चार्ली बसल्यानंतर काय काय होते व काय काय होऊ शकते याची कल्पनाच आपण करू शकत नाही. तडफडणाऱ्या चार्लीला बघून मॅनेजरला या यंत्राची आशा सोडावी लागते.

सवयीने बोल्ट फिरवल्याची हातवारे करत असताना एक महिला कर्मचारी त्याच्या समोर येते. तिच्या स्तनाला हा बोल्ट समजून फिरवण्याचा प्रयत्न करतो. ती बिचारी घाबरून पळू लागते. या गोंधळामुळे चार्लीची रवाना वेड्यांच्या हॉस्पिटलला केली जाते.

हॉस्पिटलमधून बाहेर आल्यानंतर कशीबशी एक नोकरी त्याला मिळते. परंतु कामगारांच्या संपामुळे ती नोकरीही जाते. रस्त्यावरून जाताना ट्रकच्या पाठिमागे लावलेला झेंडा खाली पडलेला त्याला दिसतो. झेंडा परत देण्यासाठी तो गाडीचा पाठलाग करत असतो. तितक्यात संपावर असलेले कामगार त्याच्या पाठीमागून  येतात. पोलीस त्याला कामगारांचा पुढारी समजून तुरुंगात पाठवतात.

चार्लीच्या कथेला समांतर अशी अजून एका निराश्रित मुलीची कथा येथे येते. फार भूक लागली म्हणून ती ब्रेड चोरते व पळून जाते. दुकानदाराच्या लक्षात आल्यावर पोलीस तिला पकडण्यासाठी तिच्या मागे पळतात.

जेलमधून सुटलेला चार्ली तिच्यावर गुदरलेला प्रसंग ओळखून स्वतःवर चोरीचा आळ घेतो. परंतु जमलेले लोक तिलाच पकडण्यासाठी हट्ट धरतात. त्याला फार वाईट वाटते. चार्ली कुठल्यातरी एका हॉटेलमध्ये भरपूर खाऊन पैसे नाहीत म्हणून सांगितल्यावर  पहारेकरी त्याला पोलीसांच्या हवाली करतात. पोलीस त्याला गाडीत कोंबतात. तितक्यात ती अनाथ मुलगीसुद्धा गाडीत येते. वाटेत ती मागे उभे असलेल्या पोलीसाला ढकलून चार्लीसकट खाली पडते. सर्व जण बेशुद्ध होतात. काही वेळाने चार्ली शुद्धीवर येतो. त्या मुलीला उठवून पळून जायला सांगतो. ती पळते. परंतु चार्लीला सोबत घेऊन एका मोडक्या-तोडक्या  झोपडीत राहू लागते.

चार्लीला एका मोठ्या मॉलमध्ये रात्रपाळीची नोकरी लागते. त्या मॉलवर चोरी करण्यासाठी काही जण येतात. ते फक्त खाण्या-पिण्याचे पदार्थ चोरतात. ते सर्व संपावर असलेले कामगार असतात व  उपासमारीमुळे चोरी करतात. चार्लीला ते ओळखतात व सर्व जण मिळून सर्व पदार्थ खाऊन संपवतात. दुसऱ्या दिवशी मालकाला कळल्यानंतर चार्लीला पुन्हा तुरुंगात जावे लागते.

त्या मुलीला एका हॉटेलमध्ये नर्तकीचे काम मिळते. तुरुंगातून सुटलेला चार्ली तिच्या वशिल्याने तेथे गायक होतो. काही गंमतीदार प्रसंगामुळे तेथे त्या मुलीला पकडण्यासाठी आलेल्या पोलीसांच्या तावडीतून सुटून पुन्हा दोघेही रस्त्यावर येतात.....

हा मूक चित्रपट असूनसुद्धा दृश्याच्या अधून मधून आलेल्या  लिखित बोर्डवरून कथा सहजपणे कळते. 1936 साली अमेरिका आर्थिक महामंदीच्या विळख्यातून बाहेर पडत असताना चार्लीचा हा चित्रपट आला. भांडवलशाही, प्रचंड आणि बिनडोक उत्पादन, गळेकापू स्पर्धा, त्यामुळे माणसाच्या व्यक्तिगत गुणांचा होणारा ऱ्हास, बेकारी, बकाली, गुन्हेगारी अशा अनेक पैलूंवर तो मोलाचं भाष्य करतो, अर्थात मूकपट बनवूनच. खरं

तर या वेळेपर्यंत बोलपट आलेले होते आणि चांगलेच रुळलेही होते, पण चार्लीला चित्रपटातले संवाद आवडले नाहीत. त्याने चित्रपटात संवाद घ्यायचं नाकारलं. मात्र या चित्रपटात पार्श्वसंगीत भरपूर वापरलं.

तो स्वत:देखील पटकथा लिहीत नसे. कॅमेरातून दृश्य बघूनच चित्रीकरण त्याला हवं तसं झालं आहे की नाही, हे कळत असे आणि पुढे कथा कशी घेऊन जायची हेही समजत असे. त्यामुळे तो नेहमी प्रेक्षकांना कसं दिसतंय आणि आपण काय दाखवू इच्छितो, हे पाहत असे आणि पुढे काय करायचं हे ठरवत असे. त्यामुळे कधी कधी एका साध्या साध्या दृश्याचे 50-60 रिटेक होत असत. दिवसभराच्या शूटिंगनंतर तो स्वत:ला एका खोलीत कोंडून घेत असे आणि आपण दिवसभर शूट केलेल्या फिल्म्सवर काम करत असे. त्या खोलीत फक्त प्रोजेक्टर, दिवा, टेबल आणि खुर्ची एवढंच असायचं. तिथंच तो पुढे काय करायचं हे ठरवत असे. दिवसभराच्या कामाचा शिणवटा, भूक, झोप कशाचीही तमा तो बाळगत नसे. दिवसभर मेहनत केल्यावर संध्याकाळ आरामात, मजा करत खात-पीत घालवणं त्याला आवडत नसे. तो तितका सोशलही नव्हता.

त्याचे ‘The Kid’ (1921), ‘City Lights’ (1931), ‘Modern Times’ (1936), ‘The Great Dictator’ (1940), ‘Limelight’ (1952) हे चित्रपट ‘मास्टरपीस’ मानले जातात. आजदेखील चार्लीचे चित्रपट कुठल्या ना कुठल्या वाहिनीवर दाखवले जात असतातच. त्याची लोकमानसावरची मोहिनी यत्किंचितही कमी झालेली नाही.

इंग्लंडमधील सुरुवातीच्या वास्तव्यानंतर त्याला अमेरिकेतील हॉलिवुडचे आकर्षण वाटू लागले. तो हॉलिवुडमध्ये स्वतःच्या मालकीच्या स्टुडिओमध्ये चित्रपटांची निर्मिती करून बक्कळ पैसा कमवू लागला. नंतरच्या काळात तो अमेरिकन नागरिक झाला. दुसऱ्या जागतिक युद्धानंतर  याच्या डावीकडे

झुकलेल्या विचारामुळे तो कम्युनिस्ट असावा म्हणून त्याच्यावर पाळत ठेवली गेली. त्याच्या चित्रपटावर अमेरिकेत दाखविण्यास बंदी घालण्यात आली. या सगळ्या गोष्टींना वैतागून नंतर तो मरेपर्यंत स्वित्झर्लंडमध्ये स्थायिक झाला. नंतरच्या काळात त्याला ऑस्करसकट भरपूर पारितोषकं मिळाली. अमेरिकन जनतेसकट संपूर्ण विश्वच त्याच्या प्रेमात पडले. खऱ्या अर्थाने तो एक विश्वमानव होता.

वयाच्या 88 व्या वर्षी, 25 डिसेंबर 1977 रोजी चार्ली वारला.



# इंग्मार बर्गमन दिग्दर्शित 'वाइल्ड स्ट्रॉबेरीज'



1950 – 60च्या दशकात काही नवोदित चित्रपट दिग्दर्शकानी श्रेष्ठ चित्रपटांची निर्मिती केली. अशा चित्रपट दिग्दर्शकामध्ये स्वीडिश फिल्ममेकर, इंग्मार बर्गमनचे नाव सर्वात वरती असेल. त्याची दिग्दर्शन शैली अगदीच वेगळ्या प्रकारची, वैशिष्ट्यपूर्ण होती. चित्रपट बघत असतानाच्या पहिल्या चार पाच मिनिटातच हे चित्रपट इंग्मार बर्गमनचे (1918 –2007) आहे हे ताबडतोब लक्षात येत होते. त्या काळच्या पिढीला धार्मिकतेकडे झुकणाऱ्या तत्वज्ञानाला अशीही वेगळी बाजू असू शकते हे हळू हळू लक्षात येऊ लागले.

वास्तवाशी सुतराम संबंध नसलेले काल्पनिक जग, सांप्रदायिकतेला जखडून घेतलेल्या पुराण - मिथक कथा, स्वप्नंसुद्धा खोटी वाटावीत अशी फँटसी, आचरटपणाकडे झुकलेली कॉमेडी, ओढून ताणून आणलेली नाट्यमयता इत्यादींचा लवलेशही नसलेल्या, वास्तवाशी अगदी जवळिकी असलेल्या चित्रपटांची निर्मिती करून यशस्वी होणे अगदीच अशक्यातली गोष्ट होती. परंतु 'कॅबिनेट ऑफ डॉ. क्यालिगारी'चे रॉबर्ट वीने, 'वाइल्ड

स्ट्राबेरी'चे इंग्मार बर्गमन आदी एक्सप्रेशनिस्ट्सनी (परिणामकारी) चित्रपटांची निर्मिती करून या माध्यमाला एका वेगळया उंचीवर नेऊन ठेवले.

दुसऱ्या जागतिक महायुद्धानंतर उदयास आलेले हे एक्सप्रेशनिस्ट्स दिग्दर्शक युद्धप्रकारांचे गौरवीकरण न करता युद्धामुळे होत असलेली सामाजिक घुसळण व मानवी मनाची होत असलेली कुचंबणा यावर लक्ष केंद्रित केलेल होते. पहिल्या युद्धाच्या सुमारास जर्मनीमध्ये उदयास आलेली ही एक्सप्रेशनिस्ट्स चळवळ कलेच्या सर्व प्रांतात पसरली व चित्रपटक्षेत्रात त्याला एक वेगळे स्थान मिळाले. वास्तवदर्शी चित्रपटापेक्षा हे चित्रपट वेगळे होते. प्रेक्षकांच्या मनाचे धाव घेणारे ते चित्रपट होते. चौदाव्या शतकातील धार्मिक प्रतीकांचा वापर करून मॉरल प्लेजचे सादरीकरण करणाऱ्या चित्रपटांची निर्मिती केली गेली. मृत्युचे भय माणसांचा पिच्छा करत असते, त्यातून सुटका नाही, या आशयावर त्यांचा भर होता. अशाच चित्रपटप्रकारामध्ये 1957 साली बर्गमन यांचे 'वाइल्ड स्ट्राबेरीज' प्रदर्शित झाला.

थोडक्यात चित्रपटाची कथा अशी आहेः

प्रोफेसर इसाक बोर्गच्या 78व्या जन्मदिनी त्यांना लुंड येथील विश्व-विद्यालयातर्फे ऑनररी डॉक्टरेट पदविप्रदान करून गौरविण्यात येणार होते. इसाक यांनी वैद्यकीय क्षेत्रासाठी केलेल्या त्यांच्या अभूतपूर्व योगदानासाठी हा समारंभ आयोजित केला जात होता. त्यासाठीची सर्व तयारी पूर्ण झालेली होती. स्टॉकहोम ते लुंडला पोचण्यासाठी विमानाचे तिकिटही त्यांनी काढले होते. त्याच्यासोबत गेली कित्येक वर्षे त्यांची सेवा करणारी आगडा त्यांना सोबत करणार होती. परंतु आदल्या रात्री इसाक बोर्गने विमानाने न जाता कारने जाण्याचे अचानक ठरविल्यामुळे आगडाशी थोडीशी वादावादी झाली. आगडाला एकटीच विमानाने जावे लागत आहे म्हणून ती नाराज झाली.

दुसऱ्या दिवशी  बोर्ग मात्र हट्टाला पेटल्यासारखे त्याची सून, मारियाबरोबर कार मधून निघतो. प्रवासाच्या वेळी आपल्या सुनेला त्यांच्याबद्दल आपुलकी नाही हे त्यांच्या लक्षात येते. तिचे नवऱ्याशी भांडण झालेले असते. तिला मूल हवे असते. परंतु तिचा नवरा, इव्हाल्डला मूल नको असते.  या जगात अजून एका तोंडाची भर का घालावी म्हणून तो तिच्याशी भांडतो. इसाकसुद्धा इव्हाल्डइतकाच स्वार्थी, हट्टी आहे असे इसाकला मारिया  स्पष्ट शब्दात सुनावते.

काही वेळाने जगाची भटकंती करण्यासाठी निघालेले सारा, अंड्रे व व्हिक्टर  हे तरुण त्याना लुंडपर्यंत सोडण्याची विनंती करतात. इसाक त्यांना कारमध्ये घेतात. त्यांच्याशी गप्पा मारताना या तरुण मंडळींचा, विशेषकरून साराचा,  अल्लडपणा व मुक्त जगणे याचे त्यांना आश्चर्य वाटते. वाटेत त्यांच्या कारला अपघात होतो. दुसऱ्या कारमधील जोडपे त्यांची चूक झाली म्हणून क्षमा मागतात. या भांडकुदळ जोडप्याला आपल्या कारमधून इसाक घेऊन जातात. त्यांच्या भाडणाला कंटाळून मारिया त्यांना कारमधून अर्ध्या वाटेवर उतरवते. वाटेत ते सर्व इसाकच्या समर हाउसमध्ये काही वेळासाठी थांबतात. इसाकचे बालपण तेथे गेलेले होते. बालपणीच्या गोष्टी त्याला आठवतात. नंतर कारमधून जात असताना इसाक बोर्ग यांना लहानपणच्या कडू आठवणीचे स्वप्न पडते. गंमत म्हणजे नुकतेच भेटलेले भांडकुदळ जोडीतील नवरा, आल्मनच त्यांच्यावर आरोप करत शिक्षा देण्याचे प्रयत्न करत असतो. आपल्या इतक्या वर्षांच्या जीवनाबद्दलची स्पष्ट कल्पना इसाकला येऊ लागते.

पुढे एका पेट्रोल पंपापाशी ते पेट्रोल भरून घेण्यासाठी थांबतात. अनिरीक्षितपणे पंपावर काम करणारा त्यांच्याबद्दल गौरवोद्गार काढतो. पत्नीशी ओळख करून देतो. पेट्रोलचे पैसेसुद्धा घेत नाही. इसाक भारावून

जातो. तेथूनच जवळ असलेल्या आपल्या आईला भेटण्यासाठी सर्व जण घरापाशी उतरतात. आईचे वय नव्वदी पार केलेले असते. एकटीच ती तेथे राहत असते. तिला नऊ मुलं असतात. परंतु आता फक्त इसाकच जिवंत असतो. इसाकला-सुद्धा आपल्या एकटेपणाची तिटकारा वाटू लागते. संपूर्ण प्रवासातील अनुभव व त्यांना पडत असलेले स्वप्न यातून बोर्ग यांना आपले असली खरे रूप कळू लागते.  मारिया एखाद्या त्रयस्थासारखे वागते.

लुंड शहरी पोचल्यानंतर अत्यंत गंभीरपणे साजरा होत असलेल्या समारंभात (अगदी त्रयस्थपणे) भाग घेऊन इसाक आपल्या मुलाच्या घरी येतात. केरटेकर, आगडा  आलेली असते. स्वतःच्या मुलात व इसाक यांच्यात भरपूर फरक आहे हे त्यांना कळते. त्यांना भेटलेले ते तरुण त्रिकूट एक पुष्पगुच्छ देत त्यांचे निरोप घेते. इसाकला आपले जीवन सार्थकी लागल्यासारखे वाटू लागते. समाधानाने बोर्ग झोपण्यासाठी निघून जातात. .... व चित्रपट येथे संपतो.

तसे पाहता वाइल्ड स्ट्रॉबेरीची चित्रपटकथा सलगपणे सांगता येत नाही. वास्तवात घडलेल्या घटना, पूर्वीच्या आठवणी, चांगले व वाईट स्वप्नदृश्ये, इसाकच्या मनात आलेल्या गोष्टी इत्यादींची सरमिसळ येथे झालेली आहे. म्हातारपणामुळे काही गोष्टी आठवतात, काही नाही अशी अवस्था येथे होत असते.  त्या देशाने त्याचा फार मोठ्या प्रमाणात गौरव केला आहे. जीवन सार्थकी लागल्याचे ते लक्षण असेल. परंतु सार्वजनिकरित्या एवढा सत्कार होत असताना आपल्या जवळच्यांना त्याच्याबद्दलची अतृप्ती इसाकच्या मनाला फार लागलेली आहे. रस्त्यावरचा एक अपरिचित त्यांच्याबद्दल गौरवोद्गार काढत असताना घरातलेच त्याचे दुस्वास करत आहेत, हे त्याच्या स्वाभिमानाला धक्का पोचविणारी ठरत आहे.  मृतवत् जगत असलेल्या म्हाताऱ्या आईचा भूतकाळ, तंटे-बखेड्यात अडकलेले मुलगा-सून यांचा वर्तमानकाळ आणि सारा-व्हिक्टर-अँड्रा यांच्यापुढील उज्वल  भविष्यकाळ यांच्यामध्ये कुठे तरी इसाक बोर्गचे जीवन

अडकलेले आहे. आपण फार शहाणे आहोत या त्याच्या समजुतीलाच मोठा धक्का बसला असून अजूनही फार शिकायचे आहे, याची जाणीव नव्याने होत आहे. यशस्वी जीवनाचे मूल्यमापन कसे करायचे हा प्रश्न त्यांना सतावत आहे. भविष्याकडे झेप घेणाऱ्या वर्तमानाला भूतकाळाने वेढलेले आहे. त्यातून सुटका कशी करून घ्यायची, हेच कळेनासे झाले आहे. या चित्रपटाचा आस्वाद घेत असताना  अशा प्रकारचे अनेक प्रश्न विचारावेसे वाटतात. यातच बर्गमनची प्रतिभा प्रेक्षकांच्या लक्षात येते.

बर्गमनने साठपेक्षा जास्त चित्रपट व टीव्हीसाठी डॉक्युमेंटरीजचे दिग्दर्शन केले. ते स्वतः पटकथा लेखन करत होते. दि सेव्हंथ सील, पर्सोना, क्राइज अँड व्हिस्पर्स, दि ऑटम्न सोनाटा,  फॅन्नी अँड अलेक्झांडर हे त्याचे गाजलेले चित्रपट. त्याच्या चित्रपट निर्मितीचा ठराविक संच होता. त्यांचे बहुतेक चित्रपट स्विडनमध्येच चित्रित केले होते. 170 पेक्षा जास्त नाटकांचे दिग्दर्शन त्यानी केले.
वयाच्या 89व्या वर्षी झोपेतच त्यांचे निधन झाले.



# जीन रेनॉयर दिग्दर्शित ‘रूल्स ऑफ दि गेम’

France//1939/ Dir: Jean Renoir / B&W/ 110 min



‘रूल्स ऑफ दि गेम’ या चित्रपटाचा दिग्दर्शक जीन रेनॉयर (1894-1979) हा त्या काळातील प्रसिद्ध चित्रकार ऑगस्ट रेनॉयर यांचा मुलगा. त्यामुळे अगदी लहानपणापासूनच त्याला चित्रकलेची आवड होती. पहिल्या महायुद्धात तो फ्रेंच सैन्यात भरती झाला. युद्ध संपल्यानंतर त्याच्या वडिलाकडे मॉडेल म्हणून काम करत असलेल्या कॅथरिन हेस्लिंग या नटीबरोबर त्यानी लग्न केले. त्या नटीच्या एका चित्रपटासाठी पटकथा लिहित असताना आपणही चित्रपट का तयार करू नये असे त्याला वाटू लागले. एमिली झोला या लेखिकेच्या नाना या कादंबरीवरून त्यानी एक चित्रपट दिग्दर्शित केले (1926).

त्यानी चाळीस पेक्षा जास्त चित्रपटांची निर्मिती केली. या चित्रपटापैकी ग्रँड इल्युजन (1932) व दि रुल्स ऑफ दि गेम (1939) हे दोन चित्रपट अत्युत्कृष्ट चित्रपट असे समजले जातात,

ग्रँड इल्युजन या चित्रपटाची कथा पहिल्या महायुद्धाच्या काळातील एका युद्धछावणीत घडलेल्या प्रसंगावर आधारित होती. जर्मनांच्या या युद्ध छावणीत फ्रेंच व ब्रिटिश सैनिकाना युद्धकैदी म्हणून डांबून ठेवलेले होते. त्यावेळी जर्मन सैन्याधिकारी व युद्धकैदी यांच्यातील मनोव्यापाराच्या प्रसंगांचे चित्र उभारण्याचा प्रयत्न रेनॉयरने या चित्रपटात केला होता. 1937च्या सुमारास प्रदर्शित झालेल्या या चित्रपटातील कथा येऊ घातलेल्या महायुद्धाची नांदी होती. संपूर्ण युरोप युद्धाच्या छायेत वावरण्याची शक्यता यात वर्तविली होती. कुठल्याही प्रकारचे युद्ध मानवीयतेला काळिमा फासणारी आहे व विनाशाला कारणीभूत ठरू शकते, हाच संदेश देण्याचा प्रयत्न रेनॉयर या चित्रपटाद्वारे देत होता.

रूल्स ऑफ दि गेम हा चित्रपट उच्चभ्रू समाजाच्या अधःपतनाचे चित्रण करते. त्यांच्या छानछोकीच्या कल्पनांचे दर्शन घडविते. आंद्रे ज्यूरी हा एक साहसी वैमानिक. एकाच टप्प्यात अट्लांटिक माहासागर पार करून जागतिक विक्रम स्थापित करून पॅरिसच्या जवळच्या सागरतीरावर तो नुकताच विमानातून उतरतो. या साहसवीराचे स्वागत करण्यासाठी प्रचंड जनसमुदाय तेथे जमलेला असतो. ज्यूरी विमानातून उतरल्यानंतर त्याचा जिगरी दोस्त ऑक्टेव्ह गर्दीतून वाट काढत ज्यूरीला मिठी मारतो. जवळच उभी असलेली रेडिओ निवेदिका या प्रसंगाचे थेट प्रसारण करत असते. “तुम्हाला या विक्रमाबद्दल काय वाटते?” या तिच्या प्रश्नाला उत्तर देताना “मी फार निराश झालो आहे. कारण माझी प्रेयसी इथे आली नाही!” असे ज्यूरी म्हटल्यानंतर त्याच्या विनोद बुद्धीचे कौतुक केले जाते. जमलेले हसून दाद देतात.

ज्यूरी व ऑक्टेव्ह तेथून ज्यूरीची प्रेयसी, क्रिस्टिनेच्या घरी कारने येतात. क्रिस्टिने ही एक ऑस्ट्रियन तरुणी. ती फ्रान्स येथील रॉबर्ट लाशेने या आगर्भ श्रीमंत तरुणाशी लग्न केलेले असते. ऑक्टेव्हसुद्धा एके काळी क्रिस्टिनेवर प्रेम करत असतो. परंतु मित्रासाठी क्रिस्टिनेचे त्याग करण्याची त्याची तयारी असते. अशा प्रकारे प्रेमोन्मादाच्या वातावरणात चित्रपट पुढे सरकतो.

ज्यूरी व ऑक्टेव्ह जेव्हा रॉबर्ट लाशेनेच्या घरी येतात तेव्हा तेथे एका जंगी पार्टीची तयारी होत असते. पॅरीसमधील सर्व उच्चभ्रू तेथे येणार होते. हळू हळू अतिथी जमत असतात. रॉबर्ट लाशेनेची प्रेयसी, जिनेव्ह्व्हसुद्धा तेथे आलेली असते. एकजात सगळे प्रेमज्वर/कामज्वराने पीडित झाल्यासारखे खाऊन पिऊन मौजमजेत गुंग झालेले असतात. केवळ उच्चभ्रूच नव्हे तर तेथे जमलेले नोकर-चाकरसुद्धा यात सामील झालेले असतात.

पार्टी जोरात चालू आहे. चित्र-विचित्र मनोरंजनाच्या प्रकारांची रेलचेल आहे. चेहऱ्यावर मुखवटे असल्यामुळे कोण कुणाच्या संगतीत प्रेमाचे चाळे करत आहेत याचा पत्ता लागत नाही. ज्यूरी क्रिस्टिनेच्या सांनिध्यात तर ऑक्टेव्ह त्या घरातील लिसेट या तरुण मोलकरणीबरोबर प्रेमाचे चाळे करत आहे. या मौजमजेच्या प्रसंगी शिकार करण्याची व्यवस्था केली आहे. जमलेले हातात बंदूक घेऊन शिकार करतात. असंख्य ससे व पक्ष्यांची कत्तल केली जाते. आकाशात उडणाऱ्या पक्ष्यांना गोळया लागल्यामुळे पक्षी रक्ताच्या थारोळयात धपाधप निपचित पडतात. अशा दृश्यांची भयानकता प्रेक्षकांच्या अंगावर शहारे आणते.

शिकारीचा हा खेळ संपतो. पुन्हा एकदा सर्व पाहुणे मौजमजा करतात. प्रेमोन्मादामुळे त्यांचे खरे स्वरूप कळू लागते. द्वेष, असूया दिसू लागतात. ऑक्टेव्ह बरोबर मौजमजा करत असलेल्या लिसेटचा नवरा ऑक्टेव्हला मारून टाकतो. ज्यूरीचे प्रेमप्रकरण शिगेला पोचल्यामुळे ज्यूरीचाही खून

होतो. ज्यूरी व ऑक्टेव्हचे प्रेत घरात आणल्यानंतर वातावरण तापू लागते. परंतु हे दोन्ही खून नसून अपघात आहेत अशीच समजूत सर्व जण करून घेतात.

नैतिकतेला पूर्णपणे तिलांजली दिलेल्या या समाजाला प्रेम हा विनोदाचा विषय होतो व खून-मारामारीसुद्धा. . सश्याची कत्तलही विनोदाचाच भाग असतो.



# डि सिक्का दिग्दर्शित 'बायसिकल् थीव्हज'

Italy/1949/B&W/90' Dir: Vittoriao De Sicca



विसाव्या शतकातील महायुद्धाच्या काळात (व नंतरही) चित्रपटसृष्टी पूर्णपणे सामान्य प्रेक्षकांच्या निखळ मनोरंजनासाठीच राबत होती असे म्हटल्यास वावगे ठरणार नाही. त्यामुळेच त्याकाळचे चित्रपट भव्य, दिव्य, ट्रिक् सीन्सचे झगमगाट असलेले, प्रेक्षकांना आश्चर्यचकित करणारे, काही वेळा सुखद धक्का देणारे, काही वेळा खदखदून हसविणारे, डोळे भरून रडविणारे, अंगावर काटा आणणारे, असे भरगच्च मालमसाल्यानी भरलेले असायचे. त्याकाळचे चित्रपट ग्रीक-रोमन ऐतिहासिक कथा, पुराणकथा, बायबल-सारख्या धर्मग्रंथातील मिथके, गाजलेल्या कथा कादंबऱ्यावरील पटकथा असलेले, चॉकलेट हीरो व तथाकथित सौंदर्यसम्राज्ञीच्या रोमॅंटिक प्रसंगानी मनोरंजन करणारे, युद्धाचे, राष्ट्रभक्तीचे उदात्तीकरण करणारे, प्रेक्षकांच्या भावनांना उद्दीप्त करणारे असे होते. मात्र प्रेक्षक आपली दुःखं

विसरण्यासाठी थिएटरमध्ये खिशातील पैसे खर्च करून येतात यावर एकूण एक सर्व चित्रपट निर्मात्यांचे एकमत होते. भव्य सेट्स, दृष्यवैभवानी नटलेले, लक्ष वेधून घेणारे, मन विचलित न करू देणारे कथानक इत्यादीमुळे प्रेक्षकांना (व त्याकाळच्या समीक्षकांनासुद्धा!) चित्रपट हा एक गल्लाभरू, झटपट पैसा कमविणारा व्यवसाय असे वाटत असल्यास नवल नाही. जरी चित्रपटात संगीत, नाट्य, नृत्य इत्यादी कला प्रकार असले तरी चित्रपट हा एक आगळा वेगळा (तंत्रज्ञानावर अवलंबून असलेला) कलाप्रकार आहे असे मानण्यास कुणीही धजावत नव्हते. ( व आजही नाही.) अमेरिका, इटली, फ्रान्स इत्यादी देशामध्ये रतीब टाकल्यासारखे गल्लाभरू चित्रपटांची निर्मिती होत होती. चित्रपट हा एक कलाप्रकार असू शकतो याची पुसटशी जाणही त्याकाळात नव्हती. (काही तुरळक अपवाद वगळता 1960-70 पर्यंत भारतीय चित्रपटसृष्टीलासुद्धा ही जाण नव्हती.)

इटलीतील मुसलोनीच्या कालखंडात त्या देशात बऱ्याच मोठ्या प्रमाणात चित्रपट निघत होते. फॅसिस्ट वातावरणात कलेचा दर्जा असलेले चित्रपट तयार होणे अशक्यातलीच गोष्ट होती. तरीसुद्धा 1945च्या सुमारास चित्रपटसृष्टीला अपरिचित असलेल्या (व नंतरच्या काळात प्रसिद्धीच्या शिखरावर चढलेल्या) रॉबर्टो रोसलिनी या इटॅलियन दिग्दर्शकाचे दि ओपन सिटी हे चित्रपट साऱ्या जगाचे लक्ष वेधून घेतले. युद्धाच्या भीषणतेचे अत्यंत प्रभावीपणे चित्रण या चित्रपटात केले होते. कुठल्याही प्रसंगाचे उदात्तीकरण न केलेला हा चित्रपट वास्तवाशी जवळचे नाती सांगणारा चित्रपट होता. मानवता, जगण्याची आस या चित्रपटाचे मुख्य अंश होते. पुढील कालखंडात आलेल्या नववास्तव (Neorealistic) चित्रपटांची मुहूर्तमेढ या चित्रपटाने केली.

रोसलिनीबरोबरच उदयास आलेला व शूशाइन, बायसिकल् थीव्हज्, मिरॅकल् इन् मिलान अशा अत्यंत नावाजलेल्या कलापूर्ण चित्रपटांची निर्मिती करणारा व्हिट्टोरियो डि सिक्का हे नाव आपण कधीच विसरू शकत नाही. चित्रपट दिग्दर्शनाबरोबरच पटकथाकार व नट म्हणूनसुद्धा त्याची ख्याती होती. शूशाइनमध्ये बूट पॉलिश करून जगणाऱ्या रस्त्यावर वाढलेल्या व नंतरच्या आयुष्यात गुन्हेगारीकडे वळणाऱ्या  मुलावरील चित्रपट होता. घरदार नसलेल्या व थंडीवाऱ्यात कसेबसे जीवन जगणाऱ्यावर क्रूर अधिकारी सत्ता कसे  गाजवितात याचे चित्रण मिरॅकल् इन् मिलान या चित्रपटात होता. चित्रपटाचा शेवट मात्र  त्या गावात चमत्कार घडून सत्तेत असलेल्यांची कशी जिरली या प्रसंगाने होते.  व्हिट्टोरियो डि सिक्काचा अत्यंत गाजलेला कलापूर्ण व वास्तववादी  म्हणून वाखाणलेला चित्रपट म्हणजे बायसिकल् थीव्हज्.

या चित्रपटाची कथा अशी आहेः

नुकतेच दुसरे महायुद्ध युद्ध संपले आहे. देशाचा नाश होऊन जिणे दारुण होत आहे. सामान्यांना रोजगार नाही. जिवंत राहण्यासाठी कुठलाही उद्योग, मोल मजूरी चालेल अशी परिस्थिती आहे. पोटा-पाण्याला उद्योग हवा म्हणून थट्टे कट्टे पुरुष  वणवण फिरत आहेत. या असंख्यात लोकांपैकी अण्टोनियोसुद्धा आहे. रोम जवळच्या एका बकाल उपनगरात अण्टोनियो, त्याची पत्नी मारियो, 8-9 वर्षाचा त्याचा मुलगा, ब्रुनो व एक लहान बाळ रहात असतात. अण्टोनियो बेकार असतो. त्याला नोकरीची नितातं गरज असते. कुठेही उद्योगावकाश नाही. त्या शहरातील  कौन्सिल (म्युनिसिपालिटी) जुजबी रोजगार देत असते. त्यासाठीसुद्धा बेकारांची एम्प्लॉयमेंट एक्सचेजसमोर झुंबड. रोजगार देत असतानासुद्धा काही अटींची पूर्तता करावी अशी अपेक्षा असते. बांधकाम मजूर असल्यास, त्याची तयारी

असली तरी, दुसऱ्या प्रकारचा रोजगार दिला जात नाही.  तेथील प्रशासन नवीन कामं काढत नाही. कामगार युनियन प्रयत्नशील असूनसुद्धा उपयोग नाही.

कामाच्या शोधात असलेला अण्टोनियो त्या दिवशी  एम्प्लॉयमेंट एक्सचेजच्या ऑफिसजवळ बसलेला असतो. त्याचा मित्र पळत पळत येऊन *तुला बोलवत आहेत* अशी बातमी देतो. कौन्सिल (म्युनिसिपालिटी) तर्फे अण्टोनियोला भिंतीवर पोस्टर्स चिकटविण्याचे काम दिलेले असते. या कामासाठी स्वतःची सायकल असणे ही अट असते. परंतु मुलं-बाळ व बायको उपाशी पडतील म्हणून काही दिवसापूर्वी त्यानी स्वतःची सायकल गहाण ठेवलेली असते. तरीसुद्धा ते काम तो स्वीकारतो.  घरी त्याची पत्नी मारिया पाणी भरत असती. पतीच्या चेहऱ्याकडे बघून तिने विचारपूस केल्यावर आपल्याला नोकरी लागलेली परंतु सायकल नसल्यामुळे तो   करू शकत नाही अशी कबूली देतो. बायको लग्नाच्या वेळी भेट म्हणून मिळालेले व इतर काही कपडे गहाण टाकून गहाण ठेवलेली सायकल परत आणून अण्टोनियोच्या हातात देते. खांद्यावर सायकल घेऊनच तो कौन्सिलच्या ऑफिसला जातो. दुसऱ्या दिवसापासून कामावर हजर राहण्यासाठी सकाळी साडेसातला येऊन शिडी, पोस्टर्स, खळ इत्यादी वस्तु घेऊन जाण्यास सांगितले जाते. मारिया पतीचे ऑफिस बघण्यासाठी आलेली असते.तेथून परत घेऊन जात असताना मारियाला भविष्य वर्तविणाऱ्या एका बाईला भेटायचे असते. कारण तिने तुझ्या नवऱ्याला लवकरच रोजगार मिळेल असे भविष्य सांगितलेले असते. अण्टोनियो हे किती भंपक आहे हे सांगत असतो. रात्री त्याचा मुलगा, ब्रुनो सायकल साफ करतो. त्याला नोकरी लागल्यामुळे घरभर उत्साहाचे वातावरण असते.

दुसऱ्या दिवशी तो पेट्रोल पंपावर जुजबी काम करत असलेल्या ब्रुनोबरोबर पोस्टर चिकटविण्याच्या कामाला सायकलीवरून जातो. वाटेत ब्रुनोला पंपावर सोडून तो तेथील भितीला सायकल टेकवून शिडीवर चढून पोस्टर चिकटवित असतो. तितक्यात एक भुरटा चोर त्याची सायकल पळवितो. तो पळून जाताना पाठलाग करूनही तो सापडत नाही. त्या चोराची गँग त्याची दिशाभूल करते. गर्दीचा फायदा घेऊन चोर निसटतो. गर्दीतील लोकसुद्धा चोराला पकडण्यासाठी त्याच्या मदतीला येत नाहीत.. अण्टोनियो पोलीस स्टेशनला तक्रार नोंदविण्यास जातो. पोलीस सायकल परत मिळवून देण्यास असमर्थता प्रकट करतात व तूच ते शोधून काढण्याचा सल्ला देतात. अण्टोनियो निराश होऊन मित्राकडे मदतीसाठी जातो ब्रुनो, अण्टोनियो व त्याचे अनेक मित्र बाजारात सायकलीच्या शोधात फिरतात. सायकलीचे सुटे भाग करून विकण्याची शक्यता असते. सकाळी सकाळी चोरीचा माल तेथील बाजारात मिळेल असे कुणीतरी सांगितल्यामुळे ते तिथे जातात. त्यामुळे ब्रुनो सायकलीचे बेल व पंप याचा शोध घेतो. बाकीचे इतर सायकलीच्या पार्टच्या शोधात असतात. परंतु हाती काही लागत नाही. पाऊस येत असतो. सगळे ओलेचिंब होतात. तरी सायकलीसाठी प्रयत्न करत असतात. त्यांना तेथे सायकलीचे रीम साफ करणारा एक जण दिसतो. रजिस्ट्रड नंबर दाखविण्यास आढेवेढे गेतो. शेवटी पोलीसाकडून चौकशी होते. परंतु त्याचा रजिस्ट्रड नंबर वेगळा असल्यामुळे ते निराश होतात.

पुन्हा एकदा बाप व मुलगा सायकलीच्या शोधात निघतात. ब्रुनो व अण्टोनियोला तेथे एक म्हातारा चोराशी बोलत असलेला दिसतो. चोर सायकलीवरून पळून जातो. अण्टोनियो व ब्रुनो त्या म्हाताऱ्याच्या शोधाला लागतात. म्हातारा ‘मला काहीच माहित नाही.’ असे सांगत नाहिसा होतो. हे दोघेही त्याचा शोध घेत असताना चर्चतर्फे चालविलेल्या एका मदत केंद्रात

म्हातारा जाताना दिसतो. ते पाठलाग करत त्या केंद्रात जातात. जंग जंग पछाडले तरी म्हातारा दाद देत नाही. चर्चमध्ये प्रेयर चालविणारे स्वयंसेवक म्हाताऱ्यासकट या बाप-मुलाला हाकलून देतात. म्हातारा एक पत्ता देऊन निसटतो. तो पत्ता एका वेश्यागृहाचा असतो. अण्टोनियो घरात घुसून चोराला शोधत असतो. तेथील बायका आरडा ओरडा करू लागतात. तो माणूस सापडतो व त्याचा पाठलाग करत तो रहात असलेल्या गल्लीत जातो. तेथे तर चोराच्या घरचे तो किती साळसूद आहे अशीच भाषा करतात. अण्टोनियो त्याची मानगुट पकडून हमरी तुमरीवर येतो. परंतु नेमके त्याच वेळी चोराला फिट्स येतात. सगळे जण त्याच्या भोवती जमतात व अण्टोनियोशी भांडू लागतात. ब्रुनो तेथून हळूच निसटून एका पोलीसाला घेऊन येतो. घराची झडती घेतल्यानंतर तेथे काहीही सापडत नाही. पोलीस यानीच सायकल चोरली हे कशावरून व काही साक्षी पुरावे आहेत का अशी उलट तपासणी घेतो. शेवटी वैतगून बाप-लेक तिथून निघतात.

वाटेत ब्रुनो काही तरी बोलल्यामुळे अण्टोनियो चिडून त्याच्या थोबाडीत मारतो. ब्रुनो चिडतो. अण्टोनियोला मारल्याबद्दल फार वाईट वाटते. ब्रुनोला एका ब्रिजजवळ थांबायला सांगून तो पुन्हा कुठे तरी आपली सायकल मिळेल का याचा शोध घेण्यासाठी पुढे जातो. तेथे लोकांचा आरडा ओरडा ऐकून नदीकाठी जातो. एक मुलगा नदीत पडलेला असतो. आपलाच मुलगा नदीत पडला असे वाटून अण्टोनियोचा जीव घाबरा घुबरा होतो. ब्रुनोला पाहिल्यावर जीव भांड्यात पडतो. मृत्यु काय असते याची कल्पना तो करू शकतो.

दोघांनाही प्रचंड भूक लागलेली असते. हॉटेलमध्ये खात असताना आपल्याला किती पगार हवा याचा हिशोब दोघेही करतात. अण्टोनियो मनाशी काही तरी ठरवून बाहेर पडतो. काही तरी चमत्कार घडून आपली

सायकल नक्कीच सापडेल असे त्याला वाटू लागते. वाटेत दोघेही भविष्य सांगणाऱ्या त्या बाईकडे जातात. ती काहीबाही सांगून त्यांना कटवते.

बाब-लेक एका फुटबॉल स्टेडियमपाशी पोचतात. फुटबॉल स्टेडियमवर मॅच चाललेली असते. ढिगाने तेथे सायकली लावलेले असतात. अण्टोनियोच्या मनात घालमेल चालू होते. तेथेच एका बिल्डिंगपाशी एक सायकल त्याला दिसते. काय करावे हे सुचेनासे होते. शेवटी मनाची ठिय्या करून सायकल चोरतो व टांग मारून पुढे जातो. तितक्यात सायकलीचा मालक आरडा ओरडा करत त्याचा पाठलाग करतो. वाटेत भरपूर लोक त्याचा पाठलाग करून पकडतात व मारतात. ब्रु रडतच बापाचा हात पकडण्याचा प्रयत्न करतो. बापाचा रडवेला चेहरा पाहवेना. तितक्यात एक मध्यस्थ येऊन पोलीसाच्या ताब्यात त्याला न देता तसेच सोडून देतो. ब्रुनो व अण्टोनियो पुढे जाऊ लागतात व गर्दीत मिसळून जातात. .... व चित्रपट संपतो.

परिस्थितीच्या रेट्यामुळे सामान्य माणसाचे काय  होऊ शकते याचे एक सुंदर, नैज चित्रण आपल्याला या चित्रपटात बघायला मिळते. चित्रपटाच्या मुख्य पात्रासाठी त्याकाळच्या एखाद्या प्रसिद्ध नटाला घ्यायचा विचार डी सिक्काच्या मनात आला होता. शेवटी तो आपल्या ओळखीच्या अभिनयाचा गंध नसलेल्या  एका कामगाराला हा रोल देऊन मनासारखे काम करून घेतो. ब्रुनोच्या कॅरेक्टरसाठी रस्त्यावरील मुलाला घेऊन त्यांच्याकडून काम करून घेतो. यातील बहुतेक कॅरेक्टर्स निजी जीवनातील असून दिग्दर्शनाच्या कौशल्यातून त्यानी त्या सर्वांकडून सहज अभिनय करून घेतला. सर्व शूटिंग्स प्रत्यक्ष शहरभरातील रस्त्यावर, बाजारात, पुलाखाली व भर पावसात  केलेले असल्यामुळे तेथील सर्व प्रसंग खरेखुरे वाटतात. वास्तवाशी इतकी जवळीक तोपर्यंत कुणी चित्रित केली नव्हती. चित्रपटाच्या

प्रसंगात प्रेक्षकांचाच सहभाग असल्यामुळे चित्रपट जास्त परिणामकारक व प्रभावी झाला आहे.  चित्रपटाचा अनुभवच प्रेक्षकांचा अनुभव असे वाटू लागतो.

तसे पाहिल्यास चित्रपटाची कथा अगदी साधी व सरळ. परंतु हा साधेपणा केवळ भोळेपणातून वा अज्ञानातून आलेला आहे असे समजण्याचे कारण नाही. ही कथा फक्त अण्टोनियोची नसून ती त्याच्या कुटुंबाची आहे; त्याच्या वर्गाची आहे; व युद्धामुळे वाताहत झालेल्या समाजाचीसुद्धा आहे. अण्टोनियोवर कोसळलेल्या प्रत्येक प्रसंगातून त्याचा भोळा स्वभाव, जगाचे छक्केपंजे माहित नसणे, भावनाविवशता,  अगतिकता, हतबलता, प्रेम, राग इत्यादी सर्व गोष्टी अधोरेखित होतात. चित्रपटातून व्यक्त होणारी सामाजिक जाणीव, सामान्यांच्या रोजच्या जगण्यासाठी होत असलेली ससेहोलपट व त्याबद्दलची कळकळ हे उठून दिसतात. चित्रपटाची ही कलात्मक अभिव्यक्ती त्याची कथा व बंदिस्तपणातून आलेली आहे हे लक्षात येते. सर्वात महत्वाचे म्हणजे कष्टमय जीवनातील सर्व बारकावे छोट्या ब्रुनोच्या दृष्टीतून बघण्यास लावल्यामुळे मानवीयता, संवेदना, सहानुभूती  म्हणजे नेमके काय असतात याबद्दल प्रेक्षक विचार करू लागतो व हेच या चित्रपटाचे यश आहे. कदाचित अशा प्रकारच्या नववास्तववादी चित्रपटांनी चित्रपट व्यवसायाला कलाटणी दिली असे म्हणावेसे वाटते.

या चित्रपटाने अनेक होतकरू फिल्ममेकर्संना प्रभावित केले. त्यापैकी सत्यजित रॉयसुद्धा आहेत. त्यांनी पथेरपांचाली या त्यांच्या गाजलेल्या चित्रपटाची पटकथा लिहिलेली होती.  त्यांनासुद्धा हा चित्रपट जास्तीत जास्त वास्तविक होण्यासाठी स्टुडियोमध्ये चित्रित न करता प्रत्यक्ष लोकेशनवर जाऊन करावेसे वाटत होते. परंतु त्यांचे सर्व मित्र व हितचिंतक त्यांना वेड्यात काढतात. 1950मध्ये जाहिरात कंपनीच्या कामासाठी म्हणून सत्यजित रॉय व

त्यांची पत्नी 16 दिवसाचा बोटीचा प्रवास करून लंडनला जातात. जाताना त्यांनी लंडनमध्ये बघण्यासाठी शंभरेक चित्रपटांची यादी केलेली असते. त्यात डी सिक्का यांचे बायसिकल् थीव्ह्जसुद्धा होती. या चित्रपटांनी वास्तववादी चित्रपटाची निर्मिती करण्याच्या त्यांच्या  स्वप्नाला पुष्टी देते. व भारतात परतल्यानंतर  वास्तवस्पर्शी चित्रपट काढण्याची ते तयारी करतात. नंतरचा त्याचा प्रवास सर्वश्रुत आहे.

1974साली वयाच्या 71व्या वर्षी पॅरिस येथे कर्करोगामुळे डी सिक्काचा मृत्यु होतो.



# गोदार्द दिग्दर्शित ‘ब्रेथलेस’

France/1959/B&W/89 Min/Dir: Jean Luc Godard




दुसऱ्या जागतिक महायुद्धात होरपळलेली कित्येक युरोपियन राष्ट्रे व अमेरिका यांची युद्धानंतर जीवनाकडे बघण्याची दृष्टी फार बदलून गेली. तेथील समाजातील सामान्यांना चाकोरीबद्ध आयुष्याचा कंटाळा आला. परंपरागत जीवनाला ते विटले होते. प्रत्येक क्षेत्रात काही तरी नवीन हवे  असे त्यांना वाटत होते. चित्रपट सृष्टीसुद्धा त्याला अपवाद ठरू शकत नव्हती. चित्रपट कसा बनवावा यापेक्षाही अधिक महत्त्व तो तिकीटबारीवर कसा ‘वाजवावा’ याला येऊ लागले होते आणि हॉलीवूडमधील स्टुडिओ संस्कृती किंवा अगदी आपल्याकडेही सिनेमा कंपन्यांतून या कलेचे साचे तयार होऊ लागले होते. कथा, त्या कथेवर बेतलेली पटकथा, पात्रांच्या हालचाली

आणि भावमुद्रा, प्रकाशयोजना, दृश्य आणि ध्वनिसंकलन, त्या संकलनाच्या माध्यमातून निर्माण होणारा सिनेमाचा वेग आणि लय हे सारे घटक एकत्र आणून प्रेक्षकांसमोर सिनेमा नावाचे रसायन सादर केले जात होते. भव्य, दिव्य, अतिखर्चिक, साचेबद्ध कथा, दिलखेचक संभाषणं, (व आपल्याकडे ठच्चून भरलेली नाच-गाणी), गोड-गोड चेहऱ्याचे हीरो-हीरॉइन, इत्यादींचे आकर्षण त्याकाळी होते.

ही चाकोरी युद्धोत्तर काळातील काही सिनेदिग्दर्शक तोडू पाहत होते. रूढीमुक्त युगातील रूढीमुक्त लोकांबाबतचे सिनेमे बनवण्यासाठी ज्या तयार आणि कच्च्या पद्धती आहेत, त्या यथायोग्यपणे वापरणाऱ्यांची गरज भासत होती. आधुनिक जगण्याच्या वावटळीत सापडलेल्या समकालीन युरोपियन तरुणांच्या - पत्रकार, सैनिक, वेश्या, कामगार स्त्रिया, बुद्धिजीवी - आयुष्यांची फेरमांडणी करणारे चित्रपट हवे होते. चित्रपटात नाविन्य, गती आणि लय हवी होती, कथनाच्या कल्पना नव्या हव्या होत्या.

दुसऱ्या महायुद्धानंतर विशेषत: युरोपातील देश पूर्वपदावर येत असताना, चित्रपटांमध्ये त्या जनमानसाचे प्रतिबिंब पडणे अगदीच स्वाभाविक होते. पण आशय सादर करताना, त्याचे 'पॅकेजिंग' आणि विक्रीचे बंधन कशासाठी घ्यायचे, असे प्रश्न विचारू लागलेल्या नवतावादी आणि नवताप्रेमी दिग्दर्शकांच्या एका फळीमध्ये ज्याँ-लुक गोदार (Jean Luc Godard) होते.

ज्याँ-लुक गोदार या फ्रेंच दिग्दर्शकाचे मोठेपण सध्याच्या पिढीला फारसे माहीत असण्याचे काही कारण नाही. कारण 'ओटीटी' प्रसारामुळे, गोदार यांनी सहा दशकांपूर्वी मांडले तसे प्रवाहापेक्षा वेगळे आणि कमी-अधिक तऱ्हेवाईक, धक्कादायक सिनेमे बघण्यास ही पिढी पुरेशी सरावलेली आहे. हे सरावणे कल्पनेतही नव्हते त्या काळात, म्हणजे सिनेमाविश्वात ज्याला फ्रेंच 'नवप्रवाह' किंवा 'न्यू वेव्ह' असे मानले गेले, त्या चित्रक्रांतीच्या ऐन भरात

ज्याँ-लुक गोदार यांनी एकाहून एक वेगळे, पूर्णपणे भिन्न धाटणी आणि हाताळणीचे सिनेमे सादर केले. 1960चे ते दशक मुळातच प्रयोगशीलतेचे होते आणि कोणत्याही क्षेत्राप्रमाणे चित्रपटांच्या क्षेत्रातही प्रयोगशीलतेचे झालेले आद्यस्वागत गोदार यांच्याही वाटणीला आले. गोदारचे 'ब्रेथलेस' हे चित्रपट  फ्रेंच न्यू वेव्ह चित्रपटांची नांदी ठरली

गोदार यांच्या 'ब्रेथलेसची कथा तसे पाहिल्यास अगदी सामान्य कथा असे वाटेल. इटलीच्या मार्सेल्स या शहरात मिशेल पायोकार्ड हा कार चोरून ऐषारामी जीवन जगत असतो. चोरांना ज्याप्रकारची हाव असते तसा हाव याच्यात बिलकुल नव्हता. एकदा चोरलेल्या कारमध्ये बसून तो प्रवास करत असताना वाटेत त्याला पोलीस आडवतो. हा त्या पोलीसाचा खून करून त्याची प्रेयसी पॅट्रिशिया राहत असलेल्या पॅरिसच्या  हॉटेलमध्ये जातो. तेथे ती त्याला भेटते. ही अमेरिकन तरुणी पॅरिस शहरात पेपर विकून कसेबसे पोट भरून घेत असते. तिला फ्रेंच भाषेतील बारकावे समजत नसतात. सोर्बान विद्यापीठात तिला शिकायचे असते. ती एक कादंबरी लिहित असते. तिच्याबरोबर काही काळ तो मजेत घालवतो. गप्पा मारतात. तिला त्याचे आकर्षणही असते व तिटकाराही असतो. परत एकदा रूमवर येऊन पॅट्रिशियाबरोबर वेळ घालवतो. ती गर्भिणी आहे असे त्याला ती सांगते. पोलीस त्याचा तपास करत तिच्यापर्यंत पोचतात. ती पोलीसांना त्याचा थांगपत्ता लागू देत नाही.

मिशेलवर पोलीसांची नजर असते. त्याला पकडण्यासाठी पोलीस सापळा रचतात. परंतु मिशेल तेथून निसटतो व अजून एक कार चोरून ती विकतो. त्याच्या मित्राकडून पैसे वसूल करून पॅरिस सोडून जाण्याच्या विचारात  तो असतो. पॅट्रिशियाबराबर पॅरिसपासून लांब कोठेतरी रोमला पळून जाण्याचा बेत तो आखतो. तो तिला भेटून आपला बेत सांगतो. परंतु पॅट्रिशिया पॅरिस

सोडून जाण्यास नकार देते. त्यापूर्वी पोलीस तिला मिशेलविषयी जंग जंग पछाडतात व पुन्हा येतो असे सांगून जातात. पोलीसांचा ससेमिरा चुकवण्यासाठी ती हॉटेल सोडून मित्राच्या स्टुडिओमध्ये राहायला जाते व मिशेललाही तेथेच बोलावते. परंतु दुसऱ्याच दिवशी ती पोलीसांना तो कुठे आहे ते फोन करून सांगून टाकते.

पोलीसांच्या हातात तो सापडू नये म्हणून त्याचे मित्र त्याला मदत करण्यास तयार असतात. परंतु हा ती मदत नाकारतो. पोलीसांची गोळी लागून तो मरणावस्थेत असताना पॅट्रिशिया तेथे येते. तिला 'विश्वासघातकी' म्हणून तो जीव सोडतो. पॅट्रिशिया पोलीसांना 'विश्वासघातकी म्हणजे काय?' असे विचारते.

गोदार यानी ही कथा विलक्षणरित्या रंगवलेली आहे. हा चित्रपट प्रेमाचे स्वरूप व त्याची भाषा याबद्दलचे दिग्दर्शकाच्या मतांची मांडणी करते. साठाव्या दशकातील लैंगिकतेला अवास्तव महत्व देण्याच्या पार्श्वभूमीकडे नजर टाकल्यास गोदारचे सांस्कृतिकतेविषयी व भांडवलशाहीविषयीची मतं या चित्रपटातील पटकथेत जागोजागी सापडतात. ज्या वेगाने आधुनिक जग बदलत आहे, मूल्यांची पुनर्मांडणी होत आहे त्याला फक्त भांडवलशाही जबाबदार नसून आधुनिक तंत्रज्ञानावर आधारलेली जीवनशैलीसुद्धा आहे, हे त्याचे मत चित्रपटातून व्यक्त होते. त्या काळापर्यंत अपरिचित असलेले जंप कट्समधून कथा वेगाने सरकत जाते. एखाद्या अमूर्त कलाकृतीसारखे चित्रपटातील चौकटी दिसू लागतात. व ही शैली नंतरच्या काळातील अनेक दिग्दर्शकानी ठिकठिकाणी वापरल्याचे जाणवते.

गोदार यांच्या बहुतेक सिनेमांमध्ये त्यांनी काहीएक भूमिका घेतल्याचेही आढळून येते. त्या काळातील दिग्दर्शक प्रभावळीप्रमाणे त्यांच्यावरही मार्क्सवादाचा प्रभाव होता. शेतकरी, विद्यार्थी या मुद्द्यावर त्यांनी मतप्रदर्शन

केलेले आहे. पण त्यांचा पिंड दिग्दर्शकाचा होता. 1960 ते 1967 या काळातील त्यांचे सिनेमे विशेष गाजले. ते सरधोपटपणे वर्णिले जातात त्याप्रमाणे बोजड वगैरे अजिबात नव्हते. उलट गोदार यांच्या व्यक्तिमत्त्वाप्रमाणेच त्यांची बहुतेक पात्रेही विलक्षण शैलीदार रंगवली गेली आहेत. A Woman Is a Woman (1961), Vivre Sa Vie (1962), Alphaville (1965), Weekend (1967), Sympathy for the Devil (1968), First Name: Carmen (1983), Hail Mary (1985) , Goodbye to Language (2014) ही त्यांची इतर गाजलेले चित्रपट आहेत.

3 डिसेंबर 1930रोजी पॅरिसमध्ये एका श्रीमंत फ्रेंच-स्विस कुटुंबात जन्मलेल्या गोदार यांनी 'अपारंपरिक चित्रपटांचा जनक' म्हणून आपले वेगळेपण जपले. अनेक वर्षे युरोपसह सर्व जगभर महत्वाचे, तसेच वादग्रस्त दिग्दर्शक म्हणून त्यांना ओळख निर्माण केली. 2010साली ऑस्कर अकादमीने गोदार यांना त्यांच्या चित्रपट कारकीर्दीचा सन्मान म्हणून जीवनगौरव पुरस्कार जाहीर केला. मात्र तो पुरस्कार त्यांनी नाकारला.

त्यांचे अलीकडेच, १३ सप्टेंबर २०२२ रोजी निधन झाले.



# अकिरो कुरोसावा दिग्दर्शित 'राशोमान'

Japan/1950/B&W/88 Min/Dir: Akira Kurosawa



एखादी कलाकृती मानवी जीवनाविषयी, नीती-अनीती, रूढी-परंपरांविषयी भाष्य करते, त्याला कालातीत मोल असते. तेव्हा ती कलाकृती अजरामर होते. 'राशोमान' हा चित्रपट, त्यातील कथानक-आशय आणि विषय मांडण्याची शैली इतकी चिरंजीवी आहे, सदा सतेज आहे की त्यामुळेच हा चित्रपट अजूनही ताजा वाटतो.

1951च्या 'व्हेनिस फिल्म फेस्टिव्हल'मध्ये या चित्रपटास 'गोल्डन लायन अॅवॉर्ड' मिळालं. चोविसाव्या 'अकॅडमी अॅवॉर्ड्स'मध्ये परकीय भाषेतील सर्वोत्कृष्ट चित्रपटाचा पुरस्कार मिळाला. याशिवाय सर्वोत्कृष्ट दिग्दर्शक, पटकथा, अभिनय असे अनेक पुरस्कार, विविध स्पर्धांमधून, या चित्रपटास

मिळाल्यानंतर जगभरातील सर्व रसिकांना जपानी चित्रपटाविषयी आस्था वाटू लागली. त्यानंतरच्या काळातसुद्धा जपानी चित्रपटांबद्दलचे कुतूहल व आकर्षण वाढतच गेले. त्यापूर्वीही जपानमध्ये चित्रपटांची निर्मिती होत होती. अमेरिका व युरोपमध्ये तुरळकपणे जपानी चित्रपटांचे प्रदर्शनही होत असत व या चित्रपटांना रसिकांचा दादही मिळत असे. परंतु ही आसक्ती तेवढ्यापुरतीच होती. व त्यामुळे जपानच्या चित्रपटांना मार्केट नाही म्हणून कुणीही तेवढे गंभीरपणे प्रयत्नही केले नाहीत.

चित्रपटांचा उदयानंतरच्या चार-पाच वर्षातच चित्रपट निर्मितीत जपान जास्त रुची दाखवू लागला. ज्या काळात अमेरिकेतसुद्धा चित्रपटांसाठीच म्हणून एकही थिएटर नव्हते त्या 1903च्या सुमारास जपानमध्ये चित्रपट प्रदर्शनासाठी एक भव्य थिएटरही बांधण्यात आले. पिटातल्या अमेरिकेतील प्रेक्षकांसाठी स्वस्तातील स्वस्त मनोरंजन म्हणून गोडावूनसारख्या ठिकाणी चित्रपटांचे प्रदर्शन होत असत. तरीसुद्धा जपानमध्ये चित्रपट हे एक अभिव्यक्तीचे साधन म्हणून नावारूपास येण्यासाठी 1921 साल उजाडावे लागले. जपानचे सर्वश्रेष्ठ चित्रपट निर्मापक म्हणून यासुजिरो ओजू याला प्रसिद्धी मिळू लागली.

जपानच्या यासुजिरो ओजु (1903-1963) केन्जी मिजोगुची (1898-1956) व अकिरा कुरोसावा (1910-1998) या तिघांची गणना जगातील उत्कृष्ट निर्मापकांमध्ये केली जाते. कुरोसावा यानी सुमारे पंचवीस चित्रपटांची निर्मिती केली. त्यातील सर्वात उत्कृष्ट चार-पाच चित्रपटांपैकी राशोमान हा एक आहे. काहींच्या मते राशोमानच सर्वात उत्कृष्ट चित्रपट आहे.

चित्रपटाची गोष्ट अशी आहेः

बाराशे वर्षापूर्वीचा काळ. जपानमधील क्योटो हे एक शहर. यादवी युद्ध व दुष्काळामुळे तेथील लोक निष्कृष्ट जिणे जगत आहेत. शहर ओस पडण्याच्या

मार्गावर आहे. या पार्श्वभूमीवर क्योटो शहराच्या वेशीतील पडक्या राशोमान गेटपासून चित्रपटाची सुरुवात होती. ‘राशोमान’ चित्रपट सुरू होतो तोच धो-धो कोसळणाऱ्या पावसात. राशोमान गेटच्या आतल्या बाजूस पावसात निवाऱ्यासाठी लाकूडतोड्या व भिक्षू उभे आहेत. त्याच वेळी अजून एक वाटसरू तेथे येतो. लाकूडतोड्या अस्वस्थपणे  काही दिवसापूर्वी घडलेल्या खुनाबद्दल बोलत असतो.  नवीन आलेला माणूस लाकूडतोड्याला सविस्तरपणे गोष्ट सांगण्याचा आग्रह धरतो. राशोमानसारख्या सुनसान, पडक्या वेशीत लाकुडतोड्या जंगलात पाहिलेल्या एका खुनाची गोष्ट सांगतो आहे.

लाकुडतोड्या जंगलात लाकूड तोडण्यासाठी जात असताना वाटेत एका स्त्रीचे कपडे झाडावर लटकलेले दिसतात. तसेच पुढे गेल्यानंतर एक घोडा चरताना दिसतो. आणखी पुढे गेल्यावर त्याला  एक प्रेत दिसते. व हे सर्व तो त्या शहराच्या पोलीस चौकीत येवून सांगतो.

एका पहारेकऱ्याला नदीकाठी डाकू सापडतो. त्याला पकडून सामुराईचा (जपानचे शूर वीर सरदाराचा) खून केल्याबद्दल खटला भरतात. व न्यायालयात साक्षी पुरावे दिले जातात. न्यायालयासमोर डाकू आपण सामुराईचा खून केल्याचे कबूल करतो. परंतु त्यानी शपथेवर सांगितलेले सत्य अशी असतेः ‘एके दिवशी जंगलातून एक सामुराई  बायकोला घोड्यावर बसवून जंगलातून नेत असताना जंगलात माझी  नजर तिच्यावर पडते. सामुराई व त्याची बायको जंगलातून जात असताना मी पाहिले; गरम वारा सुटल्यामुळे मला कसेबसे वाटले; मी सामुराईपाशी जावून _*जमीनीत गाडून ठेवलेल्या तलवारी दाखवतो* म्हणत त्याला थोडेसे लांब घेऊन गेलो; तो चांगला शूर होता. आम्हा दोघांच्या मध्ये तलवारीने चुरशीची लढाई झाली. शेवटी मी त्याला पकडून  त्याला तेथेच एका झाडाला दोरीने बांधून मी

त्याच्या समोरच  त्याच्या बायकोवर बलात्कार केला. पहिल्या पहिल्यादा ती विरोध करत होती; परंतु नंतर ती राजी झाली. _*माझ्यासारख्या बलात्कारित स्त्रीला दोन्ही पुरुष जिवंत असलेले बघविणार नाही.*_ असे तिने म्हटले. मला तिच्याबद्दल तिरस्कार वाटू लागला. *तिला मारून टाकू का?* म्हणून मी सामुराईला विचारले. तेथेच त्याच्या बायकोच्या खंजीरीने  मी सामुराईचा खून केला.' हा होता डाकूचा कबूली जवाब.

परंतु सामुराईच्या पत्नीची साक्ष वेगळी होती. 'डाकूने बलात्कार केल्यानंतर तो डाकू 'मी नावाजलेला डाकू तजोमरू' म्हणून बढाई मारू लागला व तो निघून गेला. मी सामुराईपाशी गेले व त्याला मिठी मारली. परंतु त्याच्या चेहऱ्यावरील  माझ्याबद्दलचा तिरस्कार बघून मला कसेसेच वाटले. माझी खंजीर तेथे पडली होती. व खंजिराने नवऱ्याला बांधून ठेवलेले दोर सोडण्यासाठी पुढे पुढे गेले व मी मूर्छित झाले. व मी जागे झाल्यानंतर पळून गेले व नदीत जीव देण्याचा प्रयत्न केला. परंतु मी काही मेले नाही. नंतर एका देवळात लपून बसले..'

नंतरची साक्ष मृत सामुराईची असते.   अंगात आलेल्या बाईच्या द्वारे मृत सामुराई स्वतःच्या मृत्युची गोष्ट सांगतो. 'बलात्कारानंतर डाकू तिला समाधान करत होता. परंतु माझ्या पत्नीने *नवऱ्याला मारून टाक* म्हणून डाकूला आग्रह करू लागली. डाकूला अशा  स्त्रीबद्दल घृणा उत्पन्न झाली. माझी बायको पळत सुटली. डाकू तिचा पाठलाग करत गेला. मग मी खंजीरने आत्महत्या केली. मृत्युसमयी कुणीतरी ती खंजीर माझ्या पोटातून बाहेर काढत आहे असा मला भास झाला.'  ही होती सामुराईची गोष्ट.

खटला संपल्यानंतर लाकूडतोड्या तेथून परत आलेला असतो. वाटसरू त्याला गोष्ट सांगण्यास भाग पाडतो. तो पण जंगलात घडलेल्या प्रसंगाचे वर्णन करतो. 'मी खटल्यात सांक्ष दिली नाही. कारण मला त्या भानगडीत

पडायचे नव्हते' अशी सुरुवात करून तो गोष्ट सांगू लागतो. 'साक्षीदारांने सांगितल्याप्रमाणे हा प्रसंग घडला नव्हता. डाकू त्या सामुराईच्या पत्नीला त्याच्याशी लग्न करण्याची मागणी घालतो. परंतु ती सामुराईला बंधमुक्त करते व सामुराईला डाकूबरोबर लढण्यास सांगते. सामुराईला 'असल्या' बायकोच्यासाठी स्वतःचा जीव धोक्यात घालण्याची इच्छा नव्हती. परंतु त्याची पत्नी '*जे खरे पुरुष असतात ते स्त्रीवरील प्रेमासाठी लढतात*'' म्हणून त्या दोघांनाही आव्हान देते. ते दोघे आपापली हत्यारं बाहेर काढून वार करू लागतात. पत्नीला हे सहन न झाल्यामुळे ती तोंड झाकून घेते. दोघांच्यामध्ये चुरशीची लढाई होते. डाकूच्या सुदैवामुळे तो जिंकतो व सामुराई मरतो. तोपर्यंत बायको पळून गेलेली असते. डाकू निराश होऊन सामुराईची तलवार घेऊन लंगडत लंगडत निघून जातो.'

गोष्ट सांगून झाल्यावर तितक्यात त्यांना जवळच एक नुकतेच जन्मलेलं, वाटसरूला लाकूडतोड्यानीच सामुराईच्या पोटातील रत्नजडित खंजीर उपसून काढल्याचा संशय येतो. माणुस किती स्वार्थी आहे, तसे ते बोलून दाखवतो. तितक्यात त्या तिघाना कपड्यात गुंडाळलेलं एक लहान मूल रडताना दिसते. त्या अनाथ मुलावरील गुंडाळलेले कपडे व त्याच्या अंगावरील दागिने वाटसरू चोरतो. लाकूडतोड्या त्याला तसे करण्यास मनाई करतो. परंतु  ते चोरण्यात काही पाप नाही असे समर्थन करत वाटसरू कपडे काढून घेतो.  '*स्वतःच डाकू असणारा दुसऱ्याला डाकू  म्हणू शकणार नाही*' असे वाटसरू त्याला सुनावतो. '*सगळेच स्वार्थी आहेत.*' असे म्हणत वाटसरू राशोमान गेटमधून बाहेर पडतो.

परंतु या सर्व घटना  भिक्षूच्या मानवीयतेबद्दलच्या कल्पनांना धक्का पोचवितात.  परंतु लाकुडतोड्या त्या बाळाला कडेवर घेण्याचा प्रयत्न करतो. भिक्षूला संशय येतो. परंतु लाकूडतोड्या '*माझ्या सहा लहान मुलांबरोबर या*

*अनाथ बाळालाही सांभाळतो'*. असे म्हटल्यावर भिक्षूचा त्याच्या प्रामाणिकपणावर विश्वास बसतो. लाकूडतोड्या बाळाला घेऊन जातो. तोपर्यंत पाऊस थांबलेला असतो व सूर्यप्रकाश आत येऊ लागतो.

लाकूडतोड्या, व सामुराईची बायको यांच्या नजरेतून ही घटना कशी बदलत जाते व शेवटी डाकूने सांगितलेले सत्य याचे सुंदर चित्रण दिग्दर्शकानी केले आहे. हीच घटना चित्रपटात चार वेळा दाखवलेली असली तरी नेमके काय घडले असावे याबद्दलची प्रेक्षकांची उत्सुकता शिगेला पोचते. ज्या वेळेस साक्षीसाठी बोलावलं जातं त्या वेळी प्रत्येकाच्या सांगण्यात गोष्टीतील काही साधर्म्य आढळतं, तर काही बाबतींत तफावत. दिग्दर्शक चित्रपटात एकच घटना चार जणांच्या दृष्टिकोनांतून दाखवण्याचा प्रयत्न करतो. खरं तर दृष्टिकोनही म्हणता येणार नाही, कारण नवऱ्याच्या खुन्याबद्दलची माहिती प्रत्येकाकडून वेगवेगळी मिळत राहते.

कुरोसावाने या प्रकरणाची सुनावणी प्रेक्षकांच्या न्यायालयात ठेवली. घटनेत सहभागी, साक्षी चार पात्रे एकेक करून येतात आणि एक पवित्रा घेऊन घटनात्मक 'सत्य' सांगतात. घटितासंदर्भात नेमके कुठले पात्र सत्य मांडते, त्यातील किती सत्य उघड करते व किती दडवून ठेवते, कोण शतप्रतिशत सत्य सांगते, या बाबी कुरोसावा सत्यशोधनासाठी वापरतो आणि 'अंतिम सत्य' नेमके कुठले, ते शोधण्याचे काम प्रेक्षकांवर सोपवतो.

तीच पात्रं, तेच लोकेशन दिग्दर्शक आपल्याला चार वेळेस दाखवत असताना आपल्याला चित्रपटात कुठेही कंटाळा येत नाही किंवा गोष्टीत तोचतोपणाही जाणवत नाही. कारण स्थळाची मर्यादा असल्यामुळे कॅमेरा पोझिशन्सनापण मर्यादा येतात. पण प्रत्येकाची गोष्ट ऐकताना आपण तेवढेच तल्लीन होऊन जातो आणि तेवढेच गुंतत जातो. ह्या तिघांची गोष्ट सांगत असताना दिग्दर्शक आपल्याला स्त्री-पुरुष-संबंध, त्यांच्यातील विषमता,

त्यांच्या नात्यात असलेली मालकी भावना, स्त्रीकडे असलेली शक्ती अशा विषयांना हात घालत राहतो. तर शेवटच्या प्रसंगात, सापडलेल्या अर्भकाला ‘माझ्या सहा मुलांसारखा जपेन’ असं सांगणाऱ्या लाकुडतोड्याला बघून भिक्षूच्या मनात ‘अजून ह्या जगामध्ये माणुसकी आहे’, असा आशावाद दिग्दर्शक दर्शवतो.

1950 ते 1960च्या दशकात दरवर्षी एक या प्रमाणे कुरोसावानी चित्रपट निर्मिती केली. त्यांनी दिग्दर्शित केलेल्या चित्रपटापैकी इकिरू, सेव्हन सामुराई, थ्रोन ऑफ ब्लड, रेड बीअर्ड. रन या चित्रपटांना भरपूर प्रसिद्धी मिळाली.



# क्लौझो दिग्दर्शित 'वेजिस् ऑफ फीअर'

France-Italy Joint/ 1935/ B&W/ 127 Min/Dir: H.G. Clouzot




1930च्या सुमारास जेव्हा चित्रपट 'बोलू' लागले तेव्हा युरोपमधील अनेक सिनेमा कंपन्यांना गाशा गुंडाळावा लागला. कारण ध्वनीतंत्रज्ञानाची पूर्ण मक्तेदारी अमेरिकन कंपन्यांच्याकडे होती. कंपन्या सांगतील त्या किंमतीत ध्वनीयंत्रणा विकत घेणे भाग पडत होते. कारण, काही अपवाद वगळता, मूकचित्रपटांकडे प्रेक्षकाने पाठ फिरविली होती. त्यामुळे, आवडो न आवडो, अनेक युरोपियन फिल्म मेकर्सना इतर देशाशी भागिदारी करून भांडवल उभे करावे लागत होते. भांडवल वसूलीसाठी बहुभाषेत ध्वनीमुद्रण करावे लागत होते. अशाच प्रकारच्या भागिदारीत निर्मित झालेला 'वेजिस् ऑफ फीअर' हा चित्रपट त्या काळी (व नंतरही) इतिहास घडविला. तसे पाहता 'वेजिस ऑफ फीअर' या चित्रपटाचा फिल्म मेकर, हेन्री जॉर्जेस क्लोझो (1907-1977) त्याकाळच्या इतर फिल्म मेकर्सच्या तुलनेने फार उत्कृष्ट होता असे नव्हे. परंतु चित्रपटाची भाषा व सादरीकरण यात तो फारच

निष्णात होता. प्रेक्षकांची नस त्यानी पूर्णपणे ओळखली होती. त्यामुळे त्या युद्धकाळात प्रेक्षकांचे हमखास मनोरंजन करू शकेल अशा उत्कृष्ट भयपटांची निर्मिती केली. प्रेक्षकांना पूर्ण वेळ खुर्चीला खिळवून टाकणाऱ्या कौशल्याच्या जोरावर व त्या काळच्या राजकीय परिस्थितीवर कुठलेही भाष्य न करता पुढे काय होणार याचे उत्कंठापूर्वक वाट बघायला लावणारा हा चित्रपट मैलाचा दगड समजला जातो.

तसे पाहिल्यास चित्रपटाची कथा फार गूढ वा अंगावर शहारे येणाऱ्या (हिचकॉक टाइप) प्रसंगानी भरगच्च भरलेले असे काही नाही. दक्षिण व उत्तर अमेरिकेच्या मध्यावर कुठेतरी असलेल्या एका घाणेरड्या लास पेड्रॉस या गावात घडलेली गोष्ट. चारी बाजूला लांबवर पसरलेल्या वाळवंटातील हे एक गाव. फक्त छोट्या विमानातूनच बाह्यजगाशी संपर्क. मुळात या गावात राहणारी माणसं कसे तरी करून लवकरात लवकर हे गाव सोडून जाण्याच्या बेतात असतात. परंतु बेकारीमुळे विमानाचे भाडे देण्याइतपतसुद्धा कुणाजवळही पैसे नसतात. बहुतेक जण तेथून 300 मैलावर असलेल्या पेट्रोलियम विहिरीमध्ये नोकरी लागून पैसे कमावता येईल या आशेने आलेले असतात. त्यामुळे त्या छोट्या गावातील एकमेव हॉटेल हा वेगवेगळ्या देशातून आलेले गुन्हेगार, लुच्चे, लफंगे, भामटे, बेकार व वेळ जाण्यासाठी मजा करणारे छैलछबीले आदींचा अड्डा असतो. गावात एक धड रस्ता नाही, स्वच्छता नाही, रस्त्यावर गाढव – डुकरांचा सतत वावर. एका हॉटेलच्या समोर बसून टिंगल टवाळी करण्यात हे सर्व बेकार वेळ घालवत असतात. असे हे गाव खास पेट्रोलियम कंपनीसाठी वसलेले गाव असते.

या गावातील फ्रान्सहून आलेले मारिय़ो व जो, जर्मनीहून आलेला बिंबा व इटलीहून आलेला लुइगी यांच्या भोवती विणलेली ही कथा आहे. तरण्याबांड प्लेबॉय मारियोवर तेथील हॉटेलमध्ये काम करणारी लिंडा

एकतर्फी फिदा झालेली असते. परंतु मारियो तिला रिस्पॉन्स देत नसतो. मारियोच्या खोलीत त्याच्या बरोबर राहणारा लुइगी मौजमजेची आवड असलेली अत्यंत कामसू व्यक्ती. मारियो व जो  पॅरिसहून आलेले असल्यामुळे त्यांची दोस्ती. वयोमानाने थकलेल्या जोच्या पुफ्फुसात सिमेंटची धूळ गेल्यामुळे तो कॅन्सरग्रस्त पेशंट. डॉक्टरानी फक्त आठ-नऊ महिन्याचे आयुष्य आहे असे सांगितलेले असते. त्यामुळे तेथून बाहेर पडण्यासाठी अगदी घायकुतीला आलेला हा लुइगी. जो हा एकेकाळचा गँगस्टर. जोच्या तिरसठ स्वभावामुळे तेथील अड्ड्यावरील बेकार त्याच्याकडे खुनशी नजरेने बघत असतात.  बिंबा हा गंभीर प्रकृतीचा, जास्त न बोलणारा. जर्मनीतील नाझींच्या छळामुळे त्याच्या वडिलांचा मृत्यु झालेला असतो. व हा स्वतः तीन वर्षे मिठाच्या खाणीतील शिक्षा भोगून येथे आलेला असतो.

एके दिवशी अचानकपणे अमेरिकन कंपनीच्या तेलाच्या एका विहिरीला आग लागते. आग विझत नसल्यामुळे आग इतर विहिरीवर पसरू नये यासाठी आग लागलेल्या विहिरीत स्फोट घडवून विहिर बुजवून टाकण्याचा निर्णय तेथील व्यवस्थापन घेते. स्फोट घडविण्यासाठी नायट्रोग्लिसरिनची जरूरी भासते. परंतु नायट्रोग्लिसरिनचा साठा त्या गावात असतो. जेरीकॅनमध्ये भरलेल्या या विस्फोटकांला खाच खळगे,  दरी खोऱ्यातून मोठ्या ट्रकमधून नेण्यासाठी चार ड्रायव्हर्सची गरज असते. थोडेसे दुर्लक्ष झाले तरी नायट्रोग्लिसरिन वाटेतच  ट्रकसकट जळून खाक होण्याची शक्यता माहित असूनसुद्धा जिवावर उदार होऊन ड्रायव्हिंग करावे लागणार होते.

कंपनीचा फोरमन, बिल ओ ब्राइन गावातील इच्छुक लोकामधून चार जणांची निवड करतो. ही एक अत्यंत धोकादायक मोहिम आहे हे माहित असूनसुद्धा दोन हजार डॉलर्ससाठी (व तेथून कायमचे  बाहेर पडण्यासाठी)

सर्व इच्छुक  उत्सुक असतात.  दोन हजार डालर्स म्हणजे त्यांच्यासाठी मोठी लॉटरीच. याच पैशातून कायमची मुक्ती असे स्वप्न बाळगून ते तयार होतात.

मारियो, बिंबा, लुइगी व स्मेर्लोफ या चौघांची निवड होऊन दुसऱ्या दिवशी येण्याचे ऑर्डर बिल देतो. जोची निवड न झाल्यामुळे तो बिलपाशी तक्रार करतो. बिलचे व जोचे पूर्वीच्या काळया व्यवहारातील मैत्रीमुळे बिल स्मेर्लोफ न आल्यास जो मोहिमेवर जाईल  असे आश्वासन देतो. ठरल्या प्रमाणे दुसऱ्या दिवशी स्मेलॉर्फ वगळता तिघेही येतात. स्मेर्लोफ न आल्यामुळे जोला निवडले जाते. स्मेर्लोफ नाहिसे होण्यात जोचा हात असावा असे इतरांना वाटते.

जो आणि मारियो एका ट्रकमध्ये व लुइगी व बिंबा दुसऱ्या ट्रकमध्ये  व धोका पत्करू नये म्हणून एका मागून एक असे अर्ध्या तासाच्या अंतराने जायचे असे ठरते. अगदी पहिल्या काही क्षणातच खराब रस्त्यामुळे व भल्या मोठ्या ट्रकमधील धोकादायक स्फोटकांचे जेरीकॅन घेऊन जाणे अत्यंत धोकादायक असूनसुद्धा ट्रक हळू हळू जाऊ लागतात. एके ठिकाणी रस्त्याची रिपेरी चालल्यामुळे ट्रक वळवून पुढे जाण्यासाठी लाकडी फळया टाकलेल्या तात्पुरत्या रस्त्यावरून ट्रक घेऊन जावे लागते. अशा कठिण प्रसंगी माणसाची कसोटी लागते. जो कितीही बढाया मारत असला तरी भलताच भ्याड असतो. ऐन मोक्याच्या वेळी इतरांना तो मदत करू शकत नाही.  वाटेत लुइगी व बिंबाचा ट्रक विस्फोट होऊन जळून खाक होतो  व बिंबा, लुइगींचा त्यात अंत होतो.  कसेबसे मारियो व जोंचा ट्रक  तेलाच्या विहिरीजवळ पोचत असताना रस्त्यावर पडलेल्या तेलाच्या चिखलात ट्रक रुततो. विहिरीच्या अगदी जवळ  पोचलेले असल्यामुळे तेथील सर्व जण त्यांचे अभिनंदन करू लागतात.   जो खाली उतरून वाटेवरील झाडांची फांद्या बाजूला काढत चाकाखाली टाकून ट्रक पुढे नेण्यास सांगत असताना

तो तेलाच्या डबक्यात पाय घसरून पडतो व मारियोला ट्रक नियंत्रित न करता आल्यामुळे जोच्या अंगावरून ट्रक जातो. मारियोला फार वाईट वाटते. तो फार थकलेला असल्यामुळे मूर्छित होऊन पडतो. त्यातून जागा झाल्यानंतर मित्राचेही पैसे घेऊन परतीच्या वाटेवर त्याच ट्रकने येऊ लागतो. आता कुठलीही भीती नसल्यामुळे खुषीत ड्रायव्हिंग करत येत असतो. याच्या परतीची बातमी गावात कळते. हॉटेलमध्ये सर्व जण डान्स करून आनंद व्यक्त करत असतात. दोनेक तासात मारियो येणार म्हणून लिंडासुद्धा डान्स करत असते. मृत्युला अनेक वेळा फसवल्याच्या आनंदात मारियो ड्रायव्हिंग करत असताना एका निसटत्या क्षणी ट्रकवरील ताबा सुटल्यामुळे ट्रक खोल दरीत पडतो व त्यातच मारियाचा अंत होतो.

त्याकाळी एका गाजलेल्या कादंबरीवरून क्लोझो यानी हे कथानक घेतलेले असले तरी त्यात भरपूर बदल त्यानी केले होते. दृश्यमाध्यमाला योग्य वाटेल तसे त्यात त्यानी बदल केले होते. यातच दिग्दर्शकाची प्रतिभा जाणवते. हा चित्रपट बघत असताना एका भाषाकृतीवर ते बेतलेले आहे हेसुद्धा लक्षात येत नाही.

चित्रपटाचा सुरुवातीचा भाग बघत असताना आपण एखादी डॉक्युमेंटरी तर बघत नाही ना असा भास होतो. त्या गावाची भयाणता, गरीबी, बेवारशी-बेकारांची फौज, तेथील काळाबाजार, अमेरिकन कंपन्याचे शोषणाच्या तऱ्हा, प्रेम, मैत्री, वैरत्व, प्रेमप्रकरणातून लैंगिक शोषण... असे सर्व प्रकार पडद्यावर दिसतात. परंतु नंतरचा भाग मात्र प्रेक्षकांना अक्षरशः खुर्चीला खिळवून टाकणारा. प्रत्येक फ्रेम न् फ्रेममधून उत्कंठा शिगेला पोचविणारा. वास्तवात घडलेली गोष्ट की काय असे चित्रपट बघताना वाटू लागते. भयंकर रोमांचकारी असे वाटत असतानाच एखाद्या दुःखांत काव्यासारखे चित्रपट पुढे पुढे सरकत जाते. काही तरी संदेश देत आहे किवा कुठल्यातरी उपदेशाचे

डोज पाजत आहे असले कुठलेही अभिनिवेश न बाळगता कथानकाचे पदर उलगडत गेले आहेत. भयानक व भणंग परिस्थितीतून बाहेर पडण्यासाठी माणूस कसला धोका पत्करू शकतो याचे सुरेख चित्रण आपल्याला या चित्रपटात बघायले मिळते. माणूसच माणसाचा बळी घेत स्वार्थ साधण्यासाठी कुठल्या थराला तो जाऊ शकतो व या हिंस्र समाजाला त्याचे काहीही वाटू नये याचे आपल्याला आश्चर्य वाटू लागते. माणसातील दुर्दम्य आशा व त्यासाठी तो पत्करत असलेले साहस व धोका याचा दृश्यानुभव घेत असताना चित्रपटाच्या दिग्दर्शकाच्या प्रतिभेचे कौतुक करावेसे वाटते. दिग्दर्शक आपल्यासमोर जीवनाचा एक तुकडा ठेवत आहे की काय असा भास होतो. चित्रपटांच्या अभ्यासकांसाठी हा एक मॉडेल चित्रपट म्हणून अजूनही जगभर दाखवत असतील.

क्लौझो यानी या चित्रपटानंतर डायबॉलिक्स (Les Diaboliques) नावाचा अजून एक भयपट दिग्दर्शित केला. त्याच्या द मिस्टरी ऑफ पिकॅसो या डॉक्युमेंटरीला फ्रेंच गव्हर्नमेंटचे पारितोषक मिळाले.

1977 साली हृदयाघाताने तो मरण पावला.



# नॉर्मन मॅक्लरिन दिग्दर्शित लघु चित्रपट 'नेबर्स' व 'पा दे द्यू'

ढोबळपणे चित्रपटांची दोन प्रकारात विभागणी करणे शक्य आहेः एका प्रकारात (प्रखर) वास्तवदर्शी चित्रपट व दुसऱ्या प्रकारात अभिनयाला केंद्रस्थानी ठेऊन घटनाक्रमांचे चित्रीकरण केलेले (व काही वेळा वास्तवाचा आभास निर्माण करणारे) काल्पनिक चित्रपट. परंतु अजून एक चित्रपटांचा प्रकार म्हणजे चलनवलनाचा आभास दाखविणारे Animation चित्रपट. प्रसंगातील चलनवलनांचे काही बारीकसारीक तुकडे पाडून एका विशिष्ट वेगाने डोळ्यापुढून सरकविल्यास प्रसंगाच्यां जिवंतपणाचा आभास निर्माण करणारी साधनं चित्रप़टांचा उदय होण्यापूर्वीसुद्धा होती. चित्रकथांची पट्टी चित्रपटांचा उदयापूर्वीसुद्धा लोकप्रिय होत्या. चित्रपटाचे तंत्रज्ञान अवगत झाल्यानंत कॅमेराचा वापर लिखित चित्रातून चलनवलन दाखविलेल्या चित्रमालिका-बद्दलचे कुतूहल काही कमी झाली नाही व अजूनही कार्टून चित्रपटांच्या स्वरूपात ती जिवंत आहे.

एखाद्या गोष्टीतील घडलेल्या प्रसंगाचे बारीक बारीक तपशीलाचे चित्र काढून कॅमेराने चित्रीकरण करून प्रोजेक्टरच्या सहायाने पडद्यावर दाखविलेले animated कार्टून चित्रपट आबालवृद्धांचे मनोरंजन अजूनही करतात. लिखित चित्राप्रमाणे शिल्प, बाहुल्या, काड्या, सावल्या, बिंब-प्रतिबिंब इत्यादींचा वापर करूनसुद्धा चित्रपटांची निर्मिती केली जाते. काही कलावंत कॅमेराचा वापर न करता कच्च्या फिल्मवर चित्र व साउंड ट्रॅक वापरून चित्रपटांची निर्मिती करत होते. चित्र-विचित्र तंत्र वापरून साधे दिसणाऱ्या चित्रांना विलक्षणरित्या चित्रीकरण करून रसिकांचे लक्ष वेधत होते. अशा प्रकारे चलित चित्रपटांच्या खजिन्यात कार्टून (व्यंग) चित्रपट, बाहुल्यांचे

चित्रपट, प्रकाश - सावलींचे चित्रपट, बिंब-प्रतिबिंब चित्रपट, बिन कॅमेराचे चित्रपट, चमत्कृतीयुक्तशैलीचे चित्रपट, इत्यादींची भर पडत गेली.

चित्रपटांच्या लांबीनुसारसुद्धा पूर्ण लांबीचे व लघु चित्रपट अशीही विभागणी केली जाते. थिएटर्स, वितरक व इतर निर्मितीबाह्य गोष्टीच्या मागणीनुसार 2-4 रीळ असलेले व/वा कमी वेळेत संपणाऱ्या चित्रपटांना लघु चित्रपट म्हणून ओळखले जाते. चित्रपटांची सुरुवातच मुळात लघु चित्रपटाने झाली. 1910 पर्यंतचे बहुतेक चित्रपट दहा मिनिटाच्या कालावधीपेक्षा जास्त वेळ घेत नव्हते. कारण चित्रपट या माध्यमाचा आवाका तोपर्यंत समजलेला नव्हता. नंतर मात्र हा उद्योग भरभराटीला आला; तंत्रज्ञान सुधारू लागले व चित्रपट निर्मात्यांना जनसामान्यांना मायावी जगात नेण्याची चित्रपटांची खरी ताकत कळाली. आठ-दहा रिळापेक्षा जास्त लांबीचे चित्रपट चांगला धंदा करू लागले. तरीसुद्धा लघु चित्रपटाचे स्थान अढळ राहिले. लघु चित्रपटांनी सर्जनशील कलाकांराना त्यांच्यातील कलानिर्मितीसाठी वेगळे दरवाजे उघडून दिले.

सुरुवातीच्या काळात कार्टून चित्रपट तर लघु चित्रपट म्हणूनच प्रदर्शित होत असत. कार्टून चित्रपटांच्या निर्मितीतील जगप्रसिद्ध सर्वात मोठे नाव म्हणून वाल्ट डिस्ने यांचे घेता येईल. मूक चित्रपटांच्या निर्मितीच्या शेवटच्या कालखंडात चित्रपट क्षेत्रात उतरलेले वाल्ट डिस्ने यांनी कार्टून चित्रपटांच्या निर्मितीत फार मोठा पल्ला गाठला. आबालवृद्धांचे मनोरंजन करणारे चित्रपट म्हणून अजूनही कार्टून चित्रपटांची निर्मिती होत आहे.

या लघु चित्रपट क्षेत्रातील अजून एक मोठे नाव म्हणून नॉर्मन मॅक्लरिनचे (1914-1987) घेता येईल. प्रायोगिक व चमत्कृतीयुक्त लघु चित्रपट निर्मितीत नावाजलेल्या या स्कॉटिश दिग्दर्शकाने पहिल्यांदा लंडनमधून व नंतर कॅनडामधून चित्रपटांची निर्मिती केली. तो प्रयोग म्हणून कॅमेराचा वापर

न करता फिल्मवर डायरेक्ट चित्रमालिका काढून चित्रपट तयार करत होता. ध्वनीमुद्रणासाठीसुद्धा फिल्मच्या कडेला असलेल्या ध्वनीपट्टीवर रेघोट्या मारून ध्वनी उमटवित होता. त्यामुळे त्याचे चित्रपट अगदीच वेगळ्या प्रकारचे वाटत होते. काही चित्रपटामध्ये संगीताचा एखादा तुकडा घेवून त्यानुसार रेषाची हालचाल चित्रित करत होता.

त्यानी दिग्दर्शित केलेल्या ‘नेबर्स’ या लघु चित्रपटाचे कथानक असे आहेः

**नेबर्स**

Canada/1952/8 min/Dir:Norman McLaren




एका विस्तीर्ण मैदानात दोन घरे. तेथे शेजारी शेजारी दोघे राहतात. आरामखुर्चीवर बसून पेपर वाचत असतात; चिरूट ओढत असतात; चत एकमेकाकडे बघून हसत असतात. तितक्यात तेथेच जवळपास एक फूल उमलते. दोघानाही ते फूल आवडते. ते दोघेही त्यावर मालकी हक्कासाठी भांडू लागतात; कुंपण घालू इच्छितात; हमरीतुमरीवर येतात; धक्काबुक्की करतात; रक्तबंबाळ होतात व शेवटी मरून जातात. मग तेथेच त्यांचे दफन होते व त्यांच्या थडग्यावर दोल फुलं उमलतात.

.....शेजाऱ्यावर प्रेम करा हा संदेश जगातील प्रमुख अशा सोळा भाषेत पडद्यावर झळकतो. व चित्रपट संपतो.

कथानकाची शैली नीतीकथा सांगितल्यासारखी आहे. यातील दोघेही एकमेकाच्या प्रतिबिंबासारखे दिसतात. हालचाली हुबेहूब करत असतात. व्यंगचित्राप्रमाणे दृश्यांचे चित्रीकरण केलेले असल्यामुळे चित्रपटाच्या संदेशाला वेगळा परिमाण लाभला आहे. मानवतेचे मूल्य रुजविणारा शेजाऱ्यावर प्रेम करा हा संदेश. सर्व भाषेमध्ये सर्व समाजामध्ये गेली हजारो वर्षे सांगितले जात आहे. परंतु हे मूल्य अजूनही प्रत्यक्ष कृतीत उतरले नाही. जात, धर्म, वर्ण, वर्ग वा सीमा इत्यादीसारखे काही तरी निमित्त पुढे करून व्यक्ती-व्यक्तीत, समाजा-समाजात, राष्ट्रा-राष्ट्रात तेढ निर्माण केली जात आहे. दिग्दर्शकाचा हा लघु चित्रपटसुद्धा मानवी विद्वेषाच्या अंतिम परिणामाची झळक दाखविणारा छोटासा प्रयत्न आहे.

**पा दे द्यू** ***(Pas de duex)***

*Canada/1958/13 min/Dir:Norman McLaren*

याच दिग्दर्शकाचे 'पा दे द्यू' हाही एक गंमतीशीरपणे चित्रित केलेला लघु चित्रपट आहे. कॅनडातील बॅले नृत्यप्रकारात प्रसिद्धीच्या शिखरावरील मर्सियर् व विन्सेंट वारेन यांच्या द्वंद्व नृत्याची पार्श्वभूमी या चित्रपटाला लाभली आहे. संपूर्ण चित्रपटाला गडद काळया रंगाची पार्श्वभूमी आहे. त्यावर अगदी काळजीपूर्वकपणे नियंत्रितत केलेल्या प्रकाश व्यवस्थेत शरीररेखा चमकत जातात. संपूर्ण चित्रपटात मानवीशरीराच्या सौंदर्याचे आस्वाद घेणाऱ्या डोळ्यातून शरीररेषेचे विणकाम आपल्यासमोर उभे केले जाते.

सुरवातीला एकटा पुरुष नृत्य करत स्वमग्न अवस्थेत आपले नृत्यवैभवाचे प्रदर्शन करतो. हाताच्या, पायाच्या व शरीराच्या हालचालींचा वेग वाढत वाढत



एकाचे दहा दहा प्रतिमा दिसू लागतात. बघता बघता बासुरीचे स्वर उमटत असताना दुसऱ्या कोपऱ्यात  अजून एक प्रतिमा दिसू लागते. ती स्त्रीप्रतिमा पुरुष प्रतिमेबरोबर नृत्याच्या हालचाली करू लागते. तिच्या चलनेच्याही अनेक प्रतिमा दिसू लागतात. त्या दोघांनी उचललेल्या हाताच्या, पायाच्या, शरीराच्या क्षणाक्षणाला बदलणाऱ्या मोहक हालचाली व त्याला अनुसरून दिलेले पार्श्वसंगीत इत्यादीमुळे चित्रपट प्रेक्षकांना एका वेगळ्या अनुभवविश्वात  नेवून ठेवतो. प्रतिमा मुद्रेचे हे तंत्र सूक्ष्मगणिताच्या आधारे स्टुडियोतच चित्रित केलेले असले तरी या तंत्रावर प्रेक्षकाचे लक्ष जाणार नाही याची किमया दिग्दर्शकाला साधली असून  एका वेगळ्या पुरुष-प्रकृती या आदिम अनुभवातून  प्रेक्षकांना तो घेऊन जातो.

ग्लॅस्गो स्कूल ऑफ आर्ट येथे शिक्षण घेतलेला मॅक्लरिन मुख्यतः नॅशनल फिल्म बोर्ड ऑफ कॅनडासाठी चित्रपटांची निर्मिती करत होता. त्यानी सुमारे 60 लघु चित्रपटांची निर्मिती केली. त्यात ‘फँटसी’ (8 मिनिटे) ‘ऱ्हिदमिक’ (9 मिनिटे), व ‘ए चेअरी टेल’ (10 मिनिटे) अत्यंत  गाजलेले चित्रपट आहेत. डॉक्युमेंटरी टाइप चित्रपटात लंडन पोस्ट ऑफिससाठी त्यानी चार चित्रपटांची निर्मिती केली. फिल्मवर हातानी कोरलेले, दृश्य-संगीत, ग्राफिकल ध्वनी, अमूर्त,

पिक्सिलेशन असे विविध तंत्र वापरून त्यानी चित्रपटांची निर्मिती केली. मुख्यतः या चित्रपटामधून मानवीयतेला पूरक असे संदेश देण्याचा प्रयत्न त्यानी केला. युनेस्कोच्या वतीने तो भारतातही Animationचे तंत्र शिकविण्यासाठी काही काळ आला होता. त्याच्यावर McLaren's Negatives हा चित्रपटही काढण्यात आला.

वयाच्या 73व्या वर्षी वृद्धाप्यामुळे त्याचा मृत्यु झाला.



# चार्ल्स लिंडेन दिग्दर्शित ‘बिग् सिटी ब्ल्यूज’

Netherlands/1962/B&W/24 min/Dir: Charles A. Huguenot van der Linden



लघु चित्रपट म्हणजे नेमके काय असा प्रश्न विचारल्यास चित्रपटाची लांबी वा चित्रपटाची कालावधी वा थोडक्यात सांगितलेली सिनेकथा असे सामान्यपणे सांगितले जात असते. चित्रपट निर्मिती व वितरण यांचे डिजिटायजेशन होण्यापूर्वी 10-12 रीळ असलेल्या चित्रपटांना ढोबळपणे लघु चित्रपट असे म्हटले जात होते;  व आता सुमारे 40 मिनिटापेक्षा कमी कालावधी असलेल्या चित्रपटांना लघु चित्रपट म्हटले जाते. परंतु लघु चित्रपट व पूर्ण लांबीचा चित्रपट यांची तुलना अनुक्रमे कथा व कादंबरी असे करता येईल. वाचकांची उत्कंठा वाढविणाऱ्या मोजक्याच प्रसंगाभोवती कथा विणली जाते; तर, कादंबरीचा पट भरपूर मोठा असतो. अगदीच क्षुल्लक वाटणाऱ्या क्षणांनासुद्धा मनाच्या मायक्रोस्कोपखाली बघण्यास चांगले लघु

चित्रपट भाग पाडतात. कदाचित कालरेषेवरील काही अत्युच्च क्षण पकडण्याचा हा प्रकार असावा. त्या क्षणापूर्वीच्या वा त्यानंतरच्या क्षणाबद्दल काहीही कल्पना नसतानासुद्धा त्या क्षणात प्रेक्षकांना गुंगून ठेवण्याची किमया चांगले लघु चित्रपट करू शकतात.

लघुकथेप्रमाणे लघुचित्रपटामध्ये सर्जनशीलतेला भरपूर वाव असतो. फक्त त्या माध्यमावर/कलाप्रकारावर प्रभुत्व असायला हवे. वेगवेगळ्या स्वरूपात, वेगवेगळ्या स्थितीत, वेगवेगळ्या  स्वप्नवत प्रसंगदृश्यात त्या व्यक्त करता असतात. बहुतेक श्रेष्ठ लघुचित्रपटात थोडक्यात सांगितलेली कथा, उत्कृष्ट अभिनय, कल्पनेला वाव व डोळे दिपवून टाकणारे दृश्य हे गुणविशेष आढळतात. यांची क्रमवारी करणे तितकेसे सोपे नाही. कदाचित प्रेक्षकांची चित्रपट बघतानाची मनस्थितीच याचे निर्णय घेऊ शकेल.

बिग सिटी ब्ल्यूज हा असाच एक 1962 साली प्रदर्शित झालेला 24 मिनिटाचा उत्कृष्ट लघु चित्रपट आहे. चार्ल्स लिंडेन (1909-1987) या डच चित्रपट दिग्दर्शकाची ही चित्रकृती आहे. चित्रपटाच्या सुरुवातीला शहराबाहेरील एका अर्धवट बांधलेल्या बहुमजली इमारतीच्या दरवाज्यापाशी एक अम्ब्युलन्स उभी असून काही कर्मचारी वरच्या मजल्यावरून स्ट्रेचर घेऊन येत आहेत. एका गौरवंशीय तरुणाला  आणि बेड्या घातलेला व हातात ट्रम्पेट घेतलेला एक कृष्णवर्णीय तरुणाला अजून एका गाडीत बसविले आहेत. गाड्यांच्या भोवती जमलेल्या गर्दीत एक आठ-दहा वर्षाचा मुलगा या सर्व गोष्टी पहात उभा आहे. येथूनच फ्लॅशबॅकमधून या पूर्वी घडलेली हकीकत सांगितली जात आहे.

हा मुलगा त्या निर्जन इमारतीपाशी एक ससा घेऊन येतो. त्याच्या पाठीमागे एक 14-15 वर्षाची मुलगी त्याच्या हातातील सशाला हिसकावून घेण्याचा प्रयत्न करते.  तो ससा यांच्या हातातून निसटून इमारतीच्या

पायऱ्यावरून इकडून तिकडे पळू लागते. हा मुलगा व मुलगी त्याचा पाठलाग करत एका मजल्यावरून दुसऱ्या मजल्यावर जातात. तितक्यात ससा दिसेनासा होतो. मुलगा या पळापळीत थकून जातो. मुलगी मात्र सशाला शोधत इकडून तिकडे, एका कोपऱ्यापासून दुसऱ्या कोपऱ्यापर्यंत पळत पळत जात असते. तेथेच एका मजल्याच्या भितीला पाठ टेकून एक गौरवर्णीय व दुसरा निग्रो तरुण बसलेले असतात. जमीनीवर एक-दोन दारूच्या रिकाम्या बाटल्या इतस्ततः पडलेले असतात. तरुणांचे डोळे तारवटलेले. गौरवर्णीय तरुण धडपडत उठतो व मुलीचा पाठलाग करू लागतो. मुलगी त्याच्या हातातून  निसटण्यासाठी इतस्तत इकडून तिकडे, तिकडून इकडे पळू लागते. पळत असताना इमारतीच्या आतील बाजूस उभ्या केलेल्या लाकडी फळयांच्यावर पडून तिचा जीव जातो. तरुणीची किंचाळणे ऐकून लहान मुलगा तिला शोधत शोधत येतो. निग्रो तरुण हातातील ट्रम्पेटवर एक शोकगीत वाजवत जिन्याच्या कठड्यावर बसलेला असतो. गौर वर्णीय तरुण पळून जाण्याच्या पावित्र्यात असतो. ससा एकदा दिसून नंतर दिसेनासा होतो. एका बाजूला मुलगा, दुसऱ्या बाजूला मेलेली मुलगी व अजून एका बाजूला ट्रम्पेटवर शोकगीत वाजविणारा तरुण. येथे फ्लॅशबॅक संपतो.

पुन्हा एकदा आपल्याला अम्ब्युलन्स उभी असलेली दिसते. अजून एका गाडीत ते दोन्ही तरुण, त्यांच्या भोवतालची गर्दी असे दृश्य दिसते. गाड्या तेथून जावू लागतात.....परत एक मुलगा ससा घेऊन आलेला असतो. त्याच्या हातातील सश्याला हिसकावून घेण्यासाठी एक मुलगी येते. ससा त्या भग्न इमारतीत  पळून जातो... व येथे चित्रपट संपतो.

हा चित्रपट प्रेक्षकांना अगदीच वेगळ्या प्रकारचा अनुभव देतो. पूर्ण चित्रपटभर एकही संवाद नाही; एकही शब्द उच्चारला जात नाही. एक निग्रो वादक, सश्याला हातात घेतलेला एक मुलगा, पांढरे फ्रॉक घातलेली मुलगी

व निर्जन, अर्धवट बांधलेली भग्न इमारत. एखाद्या स्वप्नातील चार घटक असल्यासारखे ते वाटतात. व जेव्हा त्या एकमेकात मिसळतात तेव्हा एक भयानक अशी घटना घडते. शेवटचे दृश्य बघत असताना प्रेक्षक डोळे चोळत खडबडून जागा होतो व परत सुरुवातीचे शॉट्स बघतो. आपण कुठून सुरुवात केली, हेच त्याला कळेनासे होते. दिग्दर्शक आपल्याला कोड्यात टाकतो. जाझ या पाश्चिमात्य संगीत प्रकारातील ब्ल्यूज या गाण्याचा खुबीने वापर केल्यामुळे चित्रपट अविस्मरणीय ठरतो. ब्ल्यूज ही धून आफ्रिकेतील निग्रोंच्या वेदना, दुःख, त्यांच्यावरील वेदना यांचे प्रतीक असते. चित्रपटात वर्णद्वेषावर, गुन्हेगारीच्या वारंवारतेवर, मुलांच्यातील निरागसतेवर, तरुणांच्या औदासीन्यतेवर दिग्दर्शक काहीतरी सांगण्याचा प्रयत्न करत आहे असे वाटू लागते. वास्तव व स्वप्न ही दरी पुसण्याचा प्रयत्न करण्यात दिग्दर्शक यशस्वी झाला आहे. हे जाणवते.

हा चित्रपट एका पातळीवर शहरांचा बकालपणा, हरवलेली संवेदनशीलता व दुसऱ्या पातळीवर माणसातील कामेच्छा व त्यासाठी काहीही करण्याची तयारी दाखविण्याचा प्रयत्न करते. सुसंस्कृततेचा टेंभा मिरवणाऱ्या वातातवरणात एका कोवळया मुलीवर अत्याचार करणारी क्रूरता, व प्रत्येक गुन्ह्याच्या मागे काळया वंशाचीच माणसं असतात हा समज व हे चक्र असेच सतत होत राहणार इत्यादी गोष्टीवर दिग्दर्शक भर देत आहे, हे लक्षात येते

चार्ल्स लिंडेन यानी आपल्या चित्रपट करीअरची सुरुवात बर्लिन येथील पॅरामाउंट वृत्तचित्रासाठीच्या कामातून केली. नंतरच्या काळात पॅरिस येथून अमेरिकन चित्रपटांची फ्रेंच आवृत्तीचे काम त्यानी केले. 1936च्या सुमारास त्यानी एक पूर्ण लांबीचे 'यंग हार्टस्' या चित्रपटाची निर्मिती केली. तो बॉक्स ऑफिसवर आपटला. परंतु चित्रपट समीक्षकाच्या पसंतीस उतरल्यामुळे

त्याचे नाव प्रसिद्धीच्या झोतात आले. जवळ जवळ पन्नास वर्षे तो वेगवेगळ्या प्रकारच्या चित्रपटांची निर्मिती करत होता. त्यानी दिग्दर्शित केलेल्या ‘डच इन सेव्हन लेसन्स’ या चित्रपटामध्ये आड्री हेपबर्न या अभिनेत्रीने काम केले. ‘धिस टायनी वर्ल्ड’ या त्याच्या डॉक्युमेंटरी चित्रपटाला 1973 सालचे ऑस्कर पारितोषक मिळाले.



# रॅाबर्ट एन्रिको दिग्दर्शित ‘ॲन अकरन्स ॲट औल क्रीक ब्रिज’

France/1962/B&W/24 min/ Dir: Robert Enrico



कथा-कादंबरीतील कल्पनारम्यतेला दृक्-श्राव्याची जोड दिल्यामुळे चित्रपट माध्यमाला फार मोठ्या प्रमाणात प्रतिसाद मिळाला हे आपण नाकारू शकत नाही. गेली शंभर वर्षे हे माध्यम तगून आहे. तंत्रज्ञान अगदीच प्राथमिक स्वरूपात असतानासुद्धा काही सर्जनशील सिनेनिर्मात्यानी धक्कातंत्र वापरून प्रेक्षकांना चकित केले आहे, एवढेच नव्हे तर वास्तवापासून दूर पळणाऱ्या प्रेक्षकांना वास्तवाची जाणीव करून देण्यातही ते यशस्वी झालेले आहेत.

रॉबर्ट एन्रिको हा त्यापैकी एक नावाजलेला दिग्दर्शक. फ्रान्स येथील पटकथाकार व चित्रनिर्माता, रॉबर्ट एन्रिको (1931-2001) यानी अँब्रोज बीयर्स या अमेरिकन लेखकाच्या  अमेरिकन यादवी युद्धाची पार्श्वभूमी असलेल्या  ॲन अकरन्स ॲट औल क्रीक ब्रिज (An Occurrence at Owl Creek Bridge)  नावाच्या कथेवरून या लघु चित्रपटाची निर्मिती केली. हा चित्रपट आजही चित्रपट क्षेत्रातील मैलाचा दगड असा मानला जातो.

अमेरिकेतील यादवी युद्धाचा तो काळ होता. दक्षिणेत कॉन्फेडरसी  व उत्तरेत युनियन असे दोन तट एकमेकावर तुटून पडले होते.  अलाबामा राज्यात धमासान लढाई चालू होती. युनियनचे सैनिक जिवाची पर्वा न करता लढत होते. ठिकठिकाणी सैनिक तळ ठोकून होते. तेथील एका खाडीच्या रक्षणाची जबाबदारी असलेले सैनिक तात्पुरत्या उभारलेल्या रेल्वेच्या लाकडी पुलाचे रक्षण करत होते. ‘पुलाजवळ येऊन टेहळणी करणाऱ्यांना मृत्युदंड दिले जाईल.’ असे बोर्ड लावलेले होते. तेथील एक नागरिक, फारुखार सैनिकांच्या तावडीत सापडतो. सैनिक त्याचे  हात बांधून पुलावरून नेत असतात. पुलाच्या मध्यभागी फाशीचे दोर लटकावण्यासाठी एक तुळई व पायाखालच्या बाजूला एक फळी सरकवलेली असते. एक सैनिक पुलाबाहेरच्या फळीच्या टोकावर फाशीची शिक्षा सुनावलेल्या कैद्याचे पाय बांधून उभा करतो. दुसरा सैनिक फळीच्या पुलाच्या आतील बाजूवर पाय रोऊन उभा राहतो. पाय काढले की फळी घसरेल व  लटकवलेल्या दोरीमुळे कैद्याचा गळा आवळला गेल्यामुळे तो मरून पाण्यात पडेल अशी व्यवस्था केलेली होती. सर्व काही सैनिकीच्या शिस्तीने एकही अवाक्षर न उच्चारता केले जात होते. कैद्याच्या गळयातील स्कार्फ काढून त्याच्या गळयात दोर आवळले.  फारुखार क्षणभर डोळे मिटतो. घरातले डोळ्यासमोर दिसतात.

त्याच्या खिशातील घड्याळ काढून घेतले जाते. सैनिकाचा प्रमुख ऑर्डर देतो. तितक्यात ....

फरुखार डोळे मिटतो. फाशीची दोरी तुटते व तो पाण्यात पडतो. हाता-पायातील दोरी सोडवून घेतो. गळ्यातील दोरी सोडवून घेतो. पाण्यात गटांगळ्या खात पुढे पुढे जातो. पाण्यात साप वळवळत असतात. तोफेच्या/बंदूकीच्या गोळ्यांचा आवाज येत असतो. तो कसाबसा जीव मुठीत धरून पाण्याच्या आतूनच पोहत पोहत पुढे जातो. भरपूर झाडे झुडपे दिसत असतात. पक्षी चिवचिव करत असतात. कोळी जाळे विणत असतो. तेवढ्या स्थितीतसुद्धा तो फुलाचा वास घेतो. गोळ्यांचा आवाज काही थांबत नाही. पुढे पुढे तो जात असतो. हाताला जखम झालेली असते. पुलापासून लांब कुठे तरी खाडीच्या दुसऱ्या किनाऱ्यावर दमून, थकून येतो व निपचित पडून राहतो. मृत्युच्या दाढेतून सुटल्याचा आनंद त्याच्या चेहऱ्यावर दिसतो. झाडा-झुडपातून  तो घराच्या गेटपाशी येतो. समोर बायको दिसते. बायको कवेत घेण्यासाठी पुढे येते. फरुखारही हसत-रडत पुढे जात असतो.

आणि...तितक्यात  फळी निसटल्याचा आवाज येतो व फाशीच्या दोरीवर लटकलेले त्याचे प्रेत दिसते. दोर तुटल्यापासून ते बायकोला कवेत घेईपर्यंतचे सर्व काही त्याच्या मृत्युच्या क्षणावेळचे व मृत्युपासून सुटका करून घेण्याचे मनाचे खेळ असतात. येथे चित्रपट संपतो.

न्यायाचे नाव घेत एक माणूस दुसऱ्या माणसाला मारून टाकणाऱ्या भयानक क्रूरतेविषयी फार मार्मिकपणे दिग्दर्शक या चित्रपटाद्वारे टिप्पणी करत आहे. एका माणसाला मारून टाकणे म्हणजे 5-6 फुटाच्या शरीराचा नाश नसून त्याचे स्वातंत्र्य, त्याच्या आशा-आकांक्षा, जिवंतपणी त्यानी विणलेली स्वप्ने, निसर्गाविषयी इतर जीव-जंतुविषयी असलेले त्याचे  प्रेम,  जगण्यातील उत्कटता, त्यातील व्याकुळता, इतरावरील भावनिक गुंतवणूक  इत्यादी सर्व

गोष्टींचा नाश होतो हे उमजूनच घेतले जात नाही. त्याचे मरण म्हणजे त्याच्या ‘जगा’लाच नष्ट करणे. माणसाला हा अधिकार कुणी दिला हा प्रश्न उपस्थित करणारी ही एक उत्कृष्ट कलाकृती आहे.



# बर्ट हानस्ट्राचे ‘ग्लास’ आणि ‘झू’

बर्ट हानस्ट्रा या दिग्दर्शकाचे हे दोन्ही चित्रपट वृत्तचित्र (Documentary) या सदरात मोडतात. वृत्तचित्र हे चित्रपटाचे एक महत्त्वाचे रूप आहे. अशा प्रकारचे चित्रपट अगदी विसाव्या शतकाच्या सुरुवातीपासून तयार केले जात होते. सर्वसाधारणपणे डॉक्युमेंटरीत सलगपणे कथा सांगितलेली नसते. असे चित्रपट एखाद्या सत्य घटनेचे चित्रण करणारे, किंवा व्यक्तीचे जीवनदर्शन घडविणारे, किंवा प्रचार करणारे असतात. परदेशांत या चित्रपटांकडे एक वेगळी विद्या म्हणून पाहिले जाते, त्यांचा अभ्यास होतो व अनेक चित्रपट लोकप्रियदेखील बनतात. मात्र भारतात त्यांना फारशी लोकप्रियता मिळालेली नाही. याचे कारण म्हणजे इतर चित्रपटांसारखे ते टॉकीजमध्ये दाखविले जाण्याची सोय नसते. आपल्याकडे बहुतेक डॉक्युमेंटरीज सरकारतर्फेच काढल्या जातात. ‘फिल्म्स डिव्हिजन ऑफ इंडिया’ने या संदर्भात महत्त्वाचे कार्य केले आहे.

एके काळी डॉक्युमेंटरीजचे दिग्दर्शन फार किचकट, वेळखाऊ (व कंटाळवाणे) असे समजले जात होते. वृत्ताच्या घटनास्थळी पोचण्यास भरपूर वेळ लागत होता. इतर सामानांची व्यवस्था करणे, फिल्म युनिटचे वेळेवर पोचणे व इतर काही अडचण ऐनवेळी उद्भविल्यास त्यावर उपाय शोधणे यातच निर्मात्याचा वेळ, श्रम व पैसा खर्ची घालावा लागत होता. त्यामुळे उत्कृष्ट डॉक्युमेंटरी बनविणे ही दिग्दर्शकाची कसोटी समजले जात होते. अलिकडे डिजिटल व्हिडिओ, हिडन् कॅमेरा, सेल फोन इत्यादी तंत्रज्ञानांची उपलब्धी व  रॉ फिल्म्सपासून सुटका मिळाल्यामुळे डॉक्युमेंटरीच्या निर्मितीत दुसरी क्रांती झाली आहे, असे म्हणता येईल. ही साधने दिग्दर्शकांच्या शरीराचे भाग झाले आहेत. त्यामुळे दिग्दर्शकांना  आपली सर्जनशीलता दाखविणे सहज शक्य होत आहे.

डॉक्युमेंटरी या सर्वसाधारणपणे माहितीपर असल्या, तरी श्रेष्ठ दिग्दर्शकाच्या हाती त्यांना कलात्मक रूप प्राप्त होते. केवळ माहिती किंवा नोंद यांच्या पलीकडे जाऊन जीवनातील काही सत्यांचा कलात्मक वेध त्या घेऊ शकतात. प्रसंगी त्या अतिशय प्रेक्षणीय व काव्यात्मदेखील बनू शकतात. बर्ट हानस्ट्राचे हे दोन्ही वृत्तचित्रपट याची साक्ष देतात. ‘ग्लास’ या वृत्तचित्रपटातून नेदरलँड्समधील काच उद्योगाचे चित्रण त्यानी उभे केले आहे.

## ग्लास

नेदरलँड्स/1958/रंगीत/10 मि/दिग्दर्शकः बर्ट हानस्ट्रा



नेदरलँड हा देश पुरातन काळापासून काचेच्या वस्तूंच्या निर्मितीसाठी नावाजलेला देश. एके काळी येथील कामगार सर्व वस्तू हातानेच बनवत होते. त्यांच्या हस्तकौशल्याचे नमूने जगभरातील राजवाड्यामध्ये, श्रीमंतांच्या

आलिशान बंगल्यामध्ये  व आता वस्तुसग्रहालयामध्ये बघण्यास मिळतात. औद्योगिक क्रांतीनतर  काही प्रक्रियांसाठी मशीन्सचा उपयोग ते करू लागले. ग्लासब्लोअर्सचे काम परंपरागत पद्धतीने होत असले तरी काचेच्या  वस्तूंना आकार देत असताना कुशल कामगार आपल्या कौशल्याची चुणुक दाखवत त्यात विविधता आणू शकतो. काचेच्या वस्तू तयार करताना कल्पनेला भरपूर वाव मिळत होता. मशीन्सच्या वापरामुळे कामाला गती मिळाली व मोठ्या प्रमाणात अशा वस्तूंचा पुरवठा करणे त्यांना शक्य झाले.

सेमी-लिक्विड अवस्थेत असलेल्या काचद्रवाला तोंडाने जोरजोराने फुंकून व/वा काठीला लाटण्यासारखे  फिरवत आकार द्यावा लागतो. त्यात थोडीशी चूक झाली तरी जीवावर बेतण्याची शक्यता असते. परंतु हे कुशल कामगार एकाग्रचित्तपणे काम करत असतात. तोंडाने फुंकत असतानाच सिगारेटचा आस्वाद घेत असतात; गप्पा मारत असतात; नृत्यशैलीत त्यांचे काम चाललेले असते. मशीन्स आल्यावरसुद्धा त्यांच्या कौशल्यात फरक पडत नाही. चार्ली चाप्लिनच्या ‘मॉडर्न टाइम्स’मध्ये दाखविल्याप्रमाणे थोडेसे दुर्लक्ष केले तरी प्रचंड प्रमाणात नुकसान होण्याची शक्यता असते. काच-निर्मितीच्या या दहा मिनिटाच्या चित्रपटात एकही संवाद नसला तरी फोटोग्राफी, पार्श्वसंगीत, चित्रचौकट्या व माँटेजमधून दिग्दर्शक प्रेक्षकांना आकर्षित करू शकतो. दहा मिनिटात आटोपणाऱ्या या डॉक्युमेंटरीमधून दिग्दर्शकाचे चित्रपट कलाप्रकारावरील पकड सहज लक्षात येते.

## झू

नेदरलँड्स/1962/रंगीत/10 मि/दिग्दर्शकः बर्ट हानस्ट्रा

प्राणी संग्रहालयवरील ही डॉक्युमेंटरी बर्ट हानस्ट्रा यानी फारच वेगळ्या पद्धतीने दिग्दर्शित केली आहे. वेळोवेळी छायाचित्रित केलेल्या रीळचे तुकडे



पुन्हा संकलन व संपादित करून बर्ट हानस्ट्रा यानी एक उत्कृष्ट डॉक्युमेंटरी चित्रित केली आहे. यातील प्रतिमाच इतक्या बोलके आहेत की त्यावर वेगळे काही सांगण्याची गरज भासत नाही. संगीत दिग्दर्शकाच्या संगीतामुळे झूमधील पिंजऱ्यातील प्राणी व पिंजऱ्याबाहेरची (प्राण्यासारखे वागणारी) माणसं यांच्यात एक समान धागा असल्याचे जाणवते. कोण कुणाला पाहत आहे हाच प्रश्न वेळोवेळी विचारावासा वाटतो. न दिसण्या ठिकाणी कॅमेरा ठेवल्यामुळे प्राण्याचे (व त्याहून अधिक प्रेक्षकांचे) नैज चित्रण – त्याच्या विचित्र हालचाली, माकडचेष्टा, चेहऱ्यावरील हावभाव, प्रेमाचे चाळे, - चित्रित करणे शक्य झाले असेल. खरे पाहता संपूर्ण डॉक्युमेंटरी माणसांच्या डोळ्यातून न बघता  प्राण्यांच्या डोळ्यातून माणसं कशी दिसू शकतात, हेच

दाखविण्याचा प्रयत्न केला आहे, असे वाटू लागते. चांगले संकलन व एडिटिंग कसे असू शकते, याचा हा एक उत्कृष्ट नमूना आहे.

यानंतरच्या इतर काही डॉक्युमेंटरीतसुद्धा हेच तंत्र त्यानी वापरले. 'एप अँड सुपरएप' या डॉक्युमेंटरीतसुद्धा त्यानी हे तंत्र वापरून प्रेक्षकांना थक्क करून सोडले आहे. या डॉक्युमेंटरीसाठी प्रसिद्ध प्राणीतज्ञ जेन गुडआल व फ्रान्स डी वाल यांचा सल्ला त्यानी घेतला होता.

नेदरलँडमधील एका लहानशा खेडेगावात बर्ट हानस्ट्रा (1916-1997) या लघु चित्रपट दिग्दर्शकाचा जन्म झाला. वडील एका शाळेत शिकवित होते. विसाव्या दशकातील मंदीमुळे गरीबीतच याचे बालपण गेले. प्रत्येक क्षण आणि दिवस सार्थकी लावण्याची जिद्द बाळगूनच हा लहानाचा मोठा झाला. निवृत्तीनंतर वडील चित्रं काढण्याच्या आपल्या छंदामध्ये वेळ घालवू लागले. शिक्षकी पेशा आवडत नसल्यामुळे तोही वडिलाप्रमाणे पेंटिंग्स काढण्यात मन गुंतवू लागला. त्याचबरोबर फोटोग्राफीत काही प्रयोग करू लागला. त्याच गावातील एका थिएटरच्या प्रोजेक्टर रूममध्ये बसून तो चित्रपट पहात असे. मोडक्या-तुटक्या वस्तू घेऊन त्यानी एक कामचलावू प्रोजेक्टर तयार करून थोडे फार पैसेही तो कमवू लागला. त्याची चित्रपटाची आवड पाहून त्याला 'दि नेदर्लँड्स अकॅडेमी ऑफ आर्ट्स अँड सायन्सेस' या संस्थेत अभ्यास करण्यासाठी प्रवेश मिळाला. प्रत्यक्ष अनुभवापेक्षा अभ्यासात मन गुंतविणे त्याला जड होऊ लागले. हानस्ट्रा स्टेज फोटोग्राफीत रुची दाखवू लागला.

1947च्या सुमारास तो माहितीपर चलचित्रांची निर्मिती करू लागला. त्याच्या 'मिरर ऑफ हॉलंड' या माहितीपटाला 1951 साली केन्स फिल्म फेस्टिव्हलमधील ग्रॅंड प्रि पारितोषक मिळाले. 1958 साली 'ग्लास' या त्याच्या माहितीपटाला अकॅडेमी पारितोषक मिळाले. 1962मध्ये त्याच्या

‘झू’ या चित्रपटालासुद्धा BAFTA चे नामांकन मिळाले. त्याने तीसपेक्षा जास्त चित्रपटांची निर्मिती केली. वयाच्या 81व्या वर्षी आजारामुळे त्याचे निधन झाले.



# भास्करबुवा बखले: भरभरून देणारे संगीतज्ञ

शैला दातार यांनी लिहिलेल्या भास्करबुवा बखले यांच्यावरील ‘देवगंधर्व’ हे ‘राजहंस’ने प्रकाशित केलेले चरित्र वाचताना संगीत व नाट्यक्षेत्रातील त्यांच्या महान कार्याबरोबरच एका प्रसन्न व्यक्तिमत्त्वाचा वाचकांना प्रत्यय येतो. ह्या दोन्ही क्षेत्रांतील बेभरवशांच्या जीवनपद्धतीची माहिती असूनसुद्धा आपल्यातील माणुसकीला धक्का न लावता एक निकोप जीवन जगलेल्या भास्करबुवांचे यथार्थ चित्रण लेखिकेने फार सुंदरपणे उभे केले आहे.

गायनाच्या क्षेत्रात त्या काळीही मातब्बर मंडळी भरपूर होती. पण केवळ काही निवडक रसिकांपुढे गाऊन मोठी बिदागी घेत स्वतःच्या जीवनात रमण्यामध्ये धन्यता न मानता, जनसामान्यांमध्ये या अभिजात कलेची गोडी निर्माण व्हावी, ह्यासाठी नाटकाच्या माध्यमातून शास्त्रीय संगीताचा प्रसार करण्यासाठी बुवांनी जन्मभर घेतलेल्या परिश्रमाची कल्पना ‘देवगंधर्व’ पुस्तक वाचताना आपल्याला येते.

लेखिकेने लिहिल्याप्रमाणे भास्करबुवा हे साधे, सरळ, निष्कपट, दिलदार, मोकळ्या मनाचे, कुटुंबवत्सल गृहस्थ होते. घरातील स्वत:ची जबाबदारी ओळखणारे होते. गाण्याच्या नादात पत्नी आणि मुली यांच्याकडे लक्षच दिले नाही किंवा चिडचिड केली, असं कधीच घडलं नाही. वेगवेगळे व्यक्तिमत्त्व असलेल्या कित्येक गुरूंचे यांच्यावर संस्कार होते. पण स्वत:च्या व्यक्तिमत्त्वाची घडण त्यांनी फार छानपणे केली होती. हिंदुस्थानी गायकी पूर्णपणे आत्मसात केल्यानंतरसुद्धा आयुष्यभर विद्यार्थी म्हणून राहणे त्यांनी पसंत केले. नत्थ्यनखाँसाहेबांकडून संगीतविद्या मिळवण्यासाठी गुरुच्या घरची पडेल ती कामे करण्यासाठी त्यांनी मागे-पुढे पाहिले नाही. विद्या संपादन करणे ह्या एका ध्यासापायी त्या काळातील कर्मठ समाजाचीसुद्धा

त्यांनी पर्वा केली नाही. खाँसाहेबांच्या अकाली मृत्यूनंतर त्यांच्या कुटुंबांच्या पालनपोषणाची जबाबदारी स्वत:वर घेतली. धारवाडसारख्या ठिकाणी त्यांचे घर सजवून दिले.

गायन, वादन ही उदरनिर्वाहाची कला म्हणून त्या काळी शक्य नव्हते. कलेच्या भणंग आयुष्य जगणारे कित्येक कलावंत आपल्या आयुष्याची होळी करत . पण बुवांनी आपल्या आयुष्याला शिस्त लावून घेतल्यामुळे तो भणंगपणा त्यांच्या आयुष्याला कधीच शिवला नाही. त्याचबरोबर अशा परिस्थितीत आपोआप येणारा पैशासाठीचा हपापलेपणासुद्धा त्यांच्या आयुष्यात कधी आला नाही. बाजारी वृत्तीने न वागता रसिकांची मने जिंकण्यासाठी भारताच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत मैफली गाजवणारे भास्करबुवा मानधनासाठी कधीच अडवणूक करत नव्हते. मिळालेली रक्कम ते मोजूनही घेत नसत. गायन वा वादनाच्या मैफलीच्या संयोजकांची त्रेधा- तिरपट करणाऱ्या आजकालच्या ‘गुणी’ कलाकारांनी बुवांचे एवढे गुण उचलले, तरीही भारतीय संगीत अधिक समृद्ध होईल.

इतर कलावंतांसाठीही बुवांच्या घरचे दरवाजे सदैव उघडे ठेवलेले असत. स्वतः एवढे मोठे कलावंत असूनसुद्धा मैफलीत कोणत्याही गवयाचं गाणे ऐकायला श्रोते म्हणून बसले, तर बुवा दिलखुलासपणे दाद देऊन प्रोत्साहन देत. साथीदारांशी आपुलकीने वागत असत. त्यांना सांभाळून उत्तेजन देत असत. अहंमदजान थिरकवांच्या साथीवर खूष होऊन त्यांना मुंबईला बोलावून घेतले व त्यांचा संसार उभा करण्यासाठी भरपूर मदत केली. त्यांच्या मनमिळावू स्वभावामुळे त्यांना सर्व क्षेत्रांतील जाणकार मंडळी अत्यंत अगत्याने वागवत असत. समजदार श्रोत्यांचे वैभव बुवांच्या वाट्याला भरपूर आले.

कित्येक गायकांचे गायन ऐकताना त्यांच्या चेहऱ्याकडे, हावभावाकडे पाहवत नाही. त्यांचे हातवारे माकडचेष्टा वाटतात. त्यामुळे रसभंग होऊन मैफलीचा पूर्ण आनंद कधीच मिळत नाही. बुवा मात्र पूर्ण मैफल प्रसन्न करून टाकत. केशवराव भोळयांच्या शब्दांत सांगायचे झाल्यास 'बुवांच्या हसऱ्या चेहऱ्याने, भारदस्त वागणुकीमुळे माझ्या मनावर फारच चांगला परिणाम झाला आणि मैफल संपेपर्यंत तो कायम राहिला. स्वरांची केवढीही मोठी खेच असो, कितीही आवर्तनांची फिरत असो, बुवांची ही हसरी मुद्रा वेडीवाकडी झाली नाही, डोळयांवरील रुमालाचा काठ कधी ढळला नाही किंवा खांद्यावरील पांढरे स्वच्छ, जरीकाठी उपरणे खाली उतरले नाही...'
श्रोत्यांच्या दृष्टीने या भारदस्तपणाला, या डौलाला, या सुहास्यवदनाला फार महत्व आहे. सुंदर गायनाला सुंदर आणि प्रसन्न व्यक्तिदर्शनाची जोड गायकाने दिली, तर प्रथमदर्शनीच मैफल आपलीशी करता येते. गायक श्रोत्यांमध्ये हा आपलेपणा निर्माण करणे, ही गायन परिणामकारक करण्याची पहिली पायरी आहे आणि बुवासारखे कलावंत ही पायरी कधीच विसरत नाहीत. त्यामुळे प्रत्येक श्रोत्याला वाटते की गवई खास आपल्याकरताच गातो आहे. हे कधी शिकवून येत नाही, हे ज्याचे त्यालाच जमते!

संगीत शिक्षणाला शिस्त लावून जास्तीत जास्त लोकांपर्यंत पोहोचणे या उद्देशाने त्यांनी 'भारत गायन समाज' ही संस्था उभी केली. शिक्षक म्हणून तेथे काम केले. विद्यार्थ्यांसाठी थोर गायकांच्या मैफलींचे आयोजन केले. अडचणीच्या वेळी पदरचे पैसे खर्च करून संस्था जिवंत ठेवली. स्वत:च्या विद्यार्थिदशेतील कटू अनुभव पुढच्या पिढीने भोगू नये म्हणून ही संस्था उभी केली. केवळ गुरूच्या लहरीवर विसंबून न राहता सोप्या रीतीने संगीताची जाण करून घेणे ह्यावर त्यांनी भर दिला. संगीताला फक्त मनोरंजनाचे साधन न मानता, एक 'विद्याशाखा' असे स्वरूप देण्याचा त्यांनी प्रयत्न केला. ह्याच

तळमळीने तळमळीने एक मोठी शिष्यपरंपरा त्यांनी उभी केली. प्रत्येक शिष्य बुवांचे ऋण आयुष्यभर मानत होता.

शैला दातार ह्यांचे बुवांचे चरित्र वाचताना न कळत आपण आजच्या कलेच्या बाजारीकरणाचा विचार करू लागतो. कमीत कमी परिश्रम करून थोड्याच कालावधीत जास्तीत जास्त पैसे कमविणारे हे कलावंत धड कलावंत पण नसतात व माणूस पण नसतात. आपल्याच कोषामध्ये राहून, स्वतःलाच मध्यबिंदू समजून आयुष्य व्यतीत करणाऱ्या अशा कलावंताबद्दल कीव वाटू लागते. बुवासारखे आयुष्याला विद्येसाठी अर्पण करणारे कलावंत आपल्यातील अंगभूत माणुसकीमुळे कित्येक लोकांच्या कोरड्या व कष्टमय आयुष्यात ओलाव्याचे काही क्षण तरी निर्माण करतात. अशा एका थोर व्यक्तीचे चरित्र स्वत:च्या अभ्यासपूर्ण लेखनातून आपल्यासमोर ठेवल्यामुळे शैला दातार अभिनंदनास पात्र आहेत.

**देवगंधर्व**

*शैला दातार*

राजहंस प्रकाशन

मूः 180 रु, पृ.सं 158



# चित्रपटस्य (पट)कथा रम्य:

'पडद्यावरचे विश्वभान' या पुस्तकाचे लेखक, संजय भास्कर जोशी, यांच्या मते श्रेष्ठ चित्रपटाचे अगदी सर्वात मूलभूत लक्षण म्हणजे चित्रपटाच्या पटकथेतला अनावश्यक फालतूपणा,  सवंग आणि बाष्कळ विनोद, अनाठायी घुसटलेली गाणी (व नाचसुद्धा) आणि बेगडी भावुकता या घटकांचा पूर्णपणे अभाव असणे. एकदा हा निकष लावला की आपण इतकी वर्षे पाहत आलेल्या शेकडो चित्रपटांपैकी 90-95 टक्के चित्रपटांची हकालपट्टी करावी लागेल. कारण या लेखकानी वा चोखंदळ रसिक/समीक्षक यांनी निवडलेल्या चित्रपटांच्या यादीतील अगदी तुरळक चित्रपट आपल्या पाहण्यात आले असतील. पुस्तक वाचून संपल्यानंतर आवडलेला किंवा लोकप्रिय चित्रपट व उत्कृष्ट चित्रपट यातील फरक नक्कीच जाणवू लागतो. मग काही तुरळक चित्रपट वगळता चित्रपट पाहण्यासाठी आपण केलेला आटापिटा, घेतलेले श्रम, वाया घालविलेला पैसा याबद्दल हळहळ वाटू लागते. कारण तद्दन सुमार चित्रपटांच्या गर्दीतून चांगले चित्रपट समजून घेण्यासाठी आपल्यातील 'नीरक्षीरविवेकबुद्धी' तितकीशी तल्लख नसते. म्हणूनच या लेखकासारखे समीक्षक नेमके हेच हेरून आपल्याला एका वेगळ्या विश्वाची सफर करून आणतात.

सुमारे पंचवीस गाजलेल्या चित्रपटांच्या पटकथांचा परिचय, त्यातील नेमका आशय व चित्रणामागील परिश्रम याबद्दलची लेखकाची मांडणी वाचताना आपण थक्क होऊन जातो. इंग्रजी, चायनीज, इराणी, तिबेटी, मेक्सिकन्, जपानीज, अशा अनेक भाषेतील हे चित्रपट आहेत. मुळात लेखकाचा भर आशय व कथानक यातील वैशिष्ट्य यावर असल्यामुळे चित्रपटातील तांत्रिक बाबी गौण ठरतात. लेखकाने चित्रपट समीक्षकांची नेहमीच्या पठडीतील परिभाषा न वापरता, वाचकांशी संवाद साधतात;

कथानक व आशयाभोवती लेखांचा डोलारा उभे करतात. त्यामुळे एकेक लेख वाचून झाल्यानंतर या चित्रपटांचा आस्वाद घ्यावेसे वाटू लागते. एकदा पाहिलेले असल्यास पुन्हा पुन्हा पाहाविशी वाटते. लेखकाने सुचविलेल्या जागा खुणावू लागतात व चित्रपटांचे श्रेष्ठत्व लक्षात राहते.

गुलाम रमझानी या इराणी दिग्दर्शकाचा इराणी भाषेतील **हयात** या सुरेख चित्रपटाचे कथानक मनाला चटका लावणारी आहे. 2005 साली प्रदर्शित झालेल्या या चित्रपटाची कथा हयात या बारा वर्षाची मुलगी व नाबत या तिच्या सात-आठ महिन्याच्या बहिणीभोवती गुंफलेली आहे. नाबत ही भलतीच गोड. गोबरे गाल, सुरेख हसरे डोळे. परंतु एकदम खट्याळ. त्या दिवशी हयातला एका स्पर्धा परीक्षेला जायची घाई. तिचे वडील अंथरुणातून न उठल्यामुळे आई त्यांना दवाखान्याला घेऊन जाते. जाताना हयातला घरकाम व बाळाची काळजी घेण्यास बजावून जाते. यातच भाऊ, अकबर नाष्टा मागतो. कसेतरी करून त्याला ती शाळेत पाठवते. तोही रडवेला चेहऱ्याने जातो. घराखालच्या गोठ्यात गाय हंबरडा फोडत असते. पाणी संपल्यामुळे विहिरीतून पाणी काढावे लागते. एक का दोन. शंभर कामे. वरताण म्हणजे आज तरी, तासभरासाठी का होईना, तिला शाळेला जायला हवे, परीक्षा द्यायला हवे. शाळेतली हुषार मुलगी म्हणून तिच्या शिक्षकांच्या कौतुकास पात्र रहायला हवे. तिच्या मनातली घालमेल, तिने केलेला आटापिटा प्रत्यक्ष पडद्यावरच पाहायला हवे.

हॉलिवुड व/वा भारतीय चित्रपटांची भ्रष्ट नक्कल करण्यात धन्यता मानणारी इराणी चित्रपटसृष्टी 1979च्या क्रांतीनंतर अब्बास किरियोस्तामी, मोहसीन मखबलमाफ, मजिद मजिदी, असगर फिरहादीसारख्या प्रतिभावंत लेखक, दिग्दर्शकांचे चित्रपट सुजाण रसिकांचे लक्ष वेधून घेतले. राजकीय व

धार्मिक सेन्सॉरशिप असूनसुद्धा त्यातून वाट काढत या दिग्दर्शकांनी चित्रपटसृष्टीला समृद्ध केले आहे.

काही चित्रपट मनाला श्रीमंत करत करत डोळ्याचेही अक्षरशः पारणे फेडतात. एखादी सुंदर कविता म्हटल्यासारखे चित्रपटातील दृश्ये, आशय व कथानक उघडत जातात. तास-दीडतासाच्या कालावधीत दृक्-श्राव्य आनंद देणारे असले चित्रपट पाहताना प्रत्येक चौकट-न-चौकट आपल्या डोळ्यात सामावत जातो  व एका वेगळ्या अनुभवातून तरंगत राहतो. अशाच उत्कृष्ट चित्रपटापैकी **‘पोस्टमेन इन द माउंटन्स**’ हा चीनी चित्रपट असून लेखक याबद्दल भरभरून लिहितात.

हळुवार सांगितलेली चित्रपटाची ही कथा अत्यंत सरळ,साधी व गुंतागुंत नसलेली आहे. त्यात अस्सल प्रादेशिकता आहे. माणसाची, प्राण्याची आणि निसर्गाची व या सर्वांची एकमेकाशी असलेल्या कोवळ्या संबंधाची आहे. आणि या संबंधातून निर्माण झालेल्या मूल्यांची ही कथा आहे.

डोंगराळ भागात काम करणारा एक पोस्टमन गुडघेदुखीने त्रस्त आहे. त्यामुळे तो लवकरच निवृत्त होणार आहे. तेथील पद्धतीप्रमाणे त्याचा वीस वर्षाचा मुलगा त्याची जागा घेणार आहे. दोन-तीन दिवस सत्तर-ऐंशी मैलाचा डोगराळ भागातील अनेक गावात खडतर फेरी मारून घरोघरी पत्रं पोचवायची जबाबदारी पोस्टमनची असते. बाप जेव्हा जात होता, तेव्हा त्याचा इमानी कुत्रा सोबत करत असे. आताची बापाची शेवटची फेरी व मुलाची पहिली फेरी. या दोघांच्या  तीन दिवसाच्या फेरीत बाप-लेक एकमेकांना जवळून बघतात, एकमेकांना ओळखू लागतात. आणि यानंतर मुलगा एकटाच बटवड्याला जाणे, या चिंतेत त्याचे आई - वडील काळजीने बेचैन होणे, त्यांच्या इमानी कुत्र्याशी असलेले नाते-संबंध इत्यादी गोष्टी दाखवणारा हा एक उत्कृष्ट चित्रपट आहे. एक साधी गोष्ट. परंतु उत्कृष्ट मांडणी.

दिग्दर्शकाने व बाप-लेकांची काम करणाऱ्यांने त्यात जीव ओतला आहे, हे प्रकर्षाने जाणवते. पोस्टमन डोगराळ भागात दूर दूर राहणाऱ्या लोकांची केवळ पत्रच पोचवत नाहीत तर तो तेथील घरघरातील, आत्यंतिक जिव्हाळ्याचा घरचा माणूस म्हणून ओळखला जातो. बाप-लेकातील दोन पिढ्यांचे संघर्षसुद्धा दिग्दर्शकाने काही दृश्यातून अधोरेखित केले आहे. हे सर्व दाखवताना दिग्दर्शक कुठल्याही प्रकारे चित्रपट भावुक वा रडकथा होणार नाही याची पूर्णपणे काळजी घेतल्याचे जाणवते. चित्रपटाच्या शेवटी मुलगा एकटाच पत्रांची पिशवी घेवून बाहेर पडतो व त्याला कुत्रा साथ देतो. म्हणूनच लेखकाला चित्रपटाला हिरवीगार कविता असे म्हणावेसे वाटले असेल.

**शॉशँक रिडेम्प्शन** हा हॉलिवुड इंग्रजी चित्रपट. भरपूर लोकप्रिय असूनसुद्धा लेखकाने उत्कृष्ट चित्रपटाच्या यादीत समाविष्ट केल्यामुळे आश्चर्याचा धक्का बसू शकेल. कारण बहुतेक वेळा गल्लाभरू, लोकप्रिय चित्रपट उत्कृष्ट ठरत नसतात. कदाचित हा चित्रपट नियमाला अपवाद ठरणारा असू शकेल.

चित्रपटाचे कथानक आशा व स्वातंत्र्य या वैश्विक मूल्यभोवती विणलेली आहे. कुठल्याही परिस्थितीत तगून राहण्यासाठी आपल्यातील इच्छाशक्तीला पर्याय नसतो. परंतु माणूस हा 'माणूस' म्हणून घेण्यासाठी जबरदस्त इच्छा-शक्तीबरोबर स्वातंत्र्याची गरज असते. शॉशँक रिडेम्प्शन या चित्रपटातून दिग्दर्शक याच मूल्यांना अधोरेखित केल्याचे जाणवते. टिम रॉबिन्स व फ्रीमन मॉर्गन यांच्या उत्कृष्ट अभिनयातून त्या व्यक्त होतात.

शॉशँक हे एका बेटावरील काल्पनिक तुरुंग आहे. चारी बाजूने समुद्रानी वेढलेली तटबंदी, अत्यंत कडक सुरक्षाव्यवस्था व क्रूरपणाचा कळस गाठलेला तेथील सर्वेसर्वा जेलर यांच्यामुळे एकदा जेलमध्ये आलेला जन्मठेपेची शिक्षा सुनावलेला कैदी स्वतःची कधीच सुटका करून घेऊ शकत

नाही, अशी त्या तुरुंगाची ख्याती होती. खोट्या आरोपामुळे जन्मठेपेची शिक्षा भोगण्यास आलेल्या टिम रॉबिन्सची तेथील दादा म्हणवून घेणाऱ्या मॉर्गन फ्रीमनशी गाठ पडते. मॉर्गन फ्रीमन तेथील कैद्यांना बाहेरच्या वस्तू आणून पुरवतो. मात्र स्वतःची सुटका करून घेण्याच्या फंदात तो कधीच पडत नाही. कारण त्याला आयुष्याचा वीट आलेला असतो.

चित्रपटाच्या पहिल्या भागात तुरुंगातील कैद्यांच मरणप्राय जगणं दाखवल आहे. दुसऱ्या भागात टिम रॉबिन्सने त्याच्यातील चांगुलपणा, दुर्दम्य इच्छाशक्ती व बुद्धिमत्ता यांच्या जोरावर तुरुंगातील वातावरणात सकारात्मक बदल घडवलेले दाखविले आहे. तिसऱ्या भागात टिम रॉबिन्स (व मॉर्गन फ्रीमन) यांचे रोमांचकारी पलायन दाखविल्यामुळे चित्रपटाचा शेवट सुखांत होतो. या सगळ्या प्रवासात टिम रॉबिन्स व नॉर्मन फ्रीमन यांच्या मैत्रीचे सुरेख चित्रण बघावयास मिळते.

चित्रपटाचा गाभा आशा आणि स्वातंत्र्य या मूलभूत मानवी मूल्याभोवती गुंफलेली आहे. मॉर्गन फ्रीमनच्या मते आशा ही सर्वात धोकादायक आणि वाईट गोष्ट असते. परंतु टिम रॉबिन्स मात्र मॉर्गन फ्रीमनला आशाच माणसाच माणूसपण जीवंत ठेऊ शकते, हे पटवून देत असतो. शेवटी दोघे स्वतंत्र होऊन तुरुंगातून कायमची सुटका करून घेतल्यानंतर दूरपर्यंत पसरलेल्या अथांग समुद्र किनाऱ्यावर भेटतात तेव्हा प्रेक्षकसुद्धा नकळत भारावून जातात.

सॅम मेडिस या दिग्दर्शकाचा, अनेक ऑस्कर पारितोषके जिंकणारा **अमेरिकन ब्यूटी** हा विसाव्या शतकाच्या परिप्रेक्ष्यातील भौतिकतेच्या आहारी गेलेल्या समाजावर आणि मिडल लाइफ क्रायसिसच्या पार्श्वभूमीवर बेतलेला अत्यंत गुंतागुंतीचा तरी सौंदर्याचा शोध घेणारा एक जबरदस्त चित्रपट आहे.

लेस्टर बर्नहॅम या मध्यमवर्गीय पुरुषाच्या कुटुंबात आत्मीयता, प्रेम, जिव्हाळा  इत्यादींचा अंश शोधूनही सापडणार नाही. तो नोकरीला वैतागलेला आणि संसारात वैफल्यग्रस्त जीवन जगत आहे. बायको आणि मुलीच्या दृष्टीने तो एक चाळिशीतला कुटुंबप्रमुख आहे. बायकोला सुखसमृद्धी, चैन व चंगळवादी जीवन जगण्याचा सोस व मुलगी वैविध्यतापूर्ण लैंगिक जीवनाच्या गप्पा ऐकण्यात मश्गुल. आयुष्य निरनिराळ्या प्रकारे अर्थपूर्ण करण्याचे प्रयत्न करत असताना त्यातील साधे सौंदर्य कसे हरवत जाते याची ही शोकांत कहाणी. चित्रपटातील लैंगिक संदर्भाने भरलेली भाषा, लैंगिकतेचे विवादास्पद दृष्ये, समलैंगिकता, ड्रग्ज, मानसिक आजार इत्यादी अनेक गोष्टी असूनसुद्धा चित्रपट प्रेक्षणीय ठरते. बारीकसारीक प्रसंगातून दिग्दर्शकाने प्रत्येक पात्र जिवंत केले आहे. ही पात्रं जगण्यातले, नात्यातले सौंदर्य शोधण्यासाठी आटोकाट प्रयत्न करत असतानाही ते एकेकटे राहतात. जगण्याची गुंतागुंत मांडणारा हा चित्रपट आपल्या जगण्यातील जाण नक्कीच वाढवू शकेल.

**पोर्फा** (दि कप) हा एक तिबेटियन भाषेतील एक सुंदर चित्रपट आहे. पोर्फा म्हणजे कप, फुटबॉलचा वर्ल्ड कप. जरी शीर्षकाचा संबंध वर्ल्ड कपशी असला तरी चित्रपटाच्या दिग्दर्शकाने  तिबेटी मठातील भिक्षूंच्या देखरेखीखाली जीवन जगणाऱ्या मुलांच्या मनातील वर्ल्ड कपचे आकर्षण यावर लक्ष केंद्रित केले आहे. धार्मिक, आध्यात्मिक व परंपरा इत्यादींचे शिक्षण घेणाऱ्या व कडक शिस्तीच्या अंमलाखाली वाढत असलेल्या मुलांच्यामध्ये वर्ल्ड कपच्या अंतिम सामन्याबद्दलचे प्रचंड कुतूहल. मठाधिपतींची करडी नजर, नैतिकता आणि वर्तणुकीबद्दलचे कठोर नियम आणि त्यांच्या तंतोतंत पालनाचा टोकाचा आग्रह, असूनसुद्धा बारा ते अठरा वर्षातील या मुलांना स्वैर हुदडावेसे वाटते, काही तरी जाणून घ्यावेसे वाटते,

नियमांची चौकट मोडाविशी वाटते, प्रार्थनेच्या वेळी डुलकी घ्यावीशी वाटते व फुटबॉलसुद्धा खेळावेसे वाटते. मठात भरती होत असतानाची विधी व इतर अनेक गोष्टी विलक्षण वाटत असले तरी या कोवळया वयातील मुलांना अशा अनैसर्गिक बंधनात अगदी लहानपणापासूनच जखडून ठेवणेही क्रूरपणाचे वाटू लागते.

याच मुलांच्या कंपूतील ऑर्जिन नावाचा बारा वर्षाचा मुलगा फुटबॉलपटु रोनाल्डोचा जबरदस्त फॅन असतो. मग ऑर्जिनचा कंपू रात्री शहरातील टीव्हीवर गुपचुप फुटबॉलचे सामने पाहतो. जेवणाच्या टेबलावर कोण जिंकणार याच्या पैजा लावल्या जातात. शेवटी ही फुटबॉलशौकीन गँग पकडली जाते. पोरांची घालमेल मात्र फायनल मॅच बघायला मिळणार की नाही यावर केंद्रित असते. दिग्दर्शक या सगळयांची सुरेख मांडणी करत असताना विनोदी प्रसंग फुलविले आहेत. मूळात यात दाखविलेला संघर्ष रूढी आणि धर्मग्रस्त जुनी जीवनशैली आणि मुक्त, खुली (स्वैर) जीवनशैली यांच्यात आहे.

गावात टीव्हीवर सामने बघायला जाण्याची चोरी रंगेहाथ पकडल्यावर आर्जिन व त्याचे सर्व मित्र भलतेच अस्वस्थ होतात. शेवटी निरुपाय होऊन मठाधीपतीची परवानगी मागण्यासाठी ऑर्जिन जातो. मठातच टीव्ही आणून अंतिम सामना बघण्यास परवानगी मिळते. परंतु भाड्याने टीव्ही आणण्यासाठी पैसे कुठून आणणार. प्रत्येक जण काहीना कही तरी करून वर्गणी भरतात.  ऑर्जिन आपल्या आईची भेट म्हणून दिलेले घड्याळ गहाण टाकून वर्गणी भरतो.  परंतु त्याचे मन खावू लागते.

एक मात्र खरे की या दि कपसाठी केलेल्या आटापिटामुळे दोन गोष्टी घडल्याः मुलांच्यामध्ये एकोपा वाढला, अभ्यास, कष्ट  वगैरे आव्हानं

स्वीकारण्याची क्षमता वाढली. दुसरे रूढीप्रिय कट्टर मठाच्या खिडक्या, दरवाजे खिळखिळे होऊ शकतात, हेही कळून चुकले.

या प्रकारे एका अतीशय साध्या कहाणीतून अनेक मूलभूत प्रश्नावर विचारात टाकणारा हा चित्रपट चुकवू नये या यादीतला असेल, असे लेखकाला वाटते.

राजेश खन्नाचा गाजलेला चित्रपट बावर्ची बघून आल्यानंतर घरघरातील भांडणं मिटवावेसे वाटू लागते. राजेश खन्नाचा (की अमिताभ बच्चनचा) आनंद चित्रपट पाहून आल्यानंतर (पुढील दोन-तीन दिवस तरी) आपणही जगाला आनंद देत फिरावेसे वाटत असते. तशाच प्रकारचा मूड **डेड् पोएट्स सोसायटी** या चित्रपटातील गंमतीशीर प्रसंग पाहिल्यानंतर आपणही शिक्षक होऊन विद्यार्थ्यांचे जीवन बदलून टाकावे असे वाटल्यास नवल नाही. आपल्यापैकी बहुतेकांच्या विद्यार्थी दशेत  मनस्वी आवडलेला एखादा शिक्षक वा आवडलेली एखादी शिक्षिका नक्कीच भेटले असतील. तशा व्यक्तींची आठवण जागविणारा शिक्षक, रॉबिन विलियम्सने या चित्रपटात रंगविला आहे.

एका ज्युनियर कॉलेजमध्ये घडलेली ही पटकथा. परंपरा, आदर आणि गुणवत्ता हेच या कॉलेजचे आधारस्तंभ. या कॉलेजच्या प्रमुखाला या गोष्टींचा प्रचंड अभिमान. यात तसूभरही इकडे-तिकडे झाले तरी आकांडतांडव करणारा. तात्पुरता शिक्षक म्हणून रुजू झालेला  शिक्षक कॉलेजची सर्व समीकरणं बिघडवतो, तेथील कडक शिस्तीला धक्का लावतो. कॉलेजचे प्रमुख, शिक्षक व पालक यांच्या जबरदस्त दडपणाखाली वावरणाऱ्या विद्यार्थ्यांच्या मनातील कोवळेपणा, उर्मी, माणूसकी आणि कला इत्यादींना हा शिक्षक मोकळी वाट करून देतो. सुंदर जीवन जगण्यासाठी प्रेरित करतो.

तो काय काय करतो, कसे प्रेरित करतो, विद्यार्थ्यांचा आवडता शिक्षक कसे होतो, हे सर्व प्रत्यक्ष पडद्यावर बघायला हवे.

या विद्यार्थ्यांपैकी एक संवेदनशील, कवीमनाचा विद्यार्थी या शिक्षकाचा पूर्वेतिहास शोधत असताना हा शिक्षक डेड् पोएट्स सोसायटी या गुप्त संघटनेचा सभासद आहे हे लक्षात येते. या सोसायटीचे सभासद शहरापासून लांब अशा एके ठिकाणी नियमितपणे भेटत असतात, कविता वाचन करतात, स्वतःच्या कविता म्हणन दाखवित असतात. शिक्षकाच्या मते ही संघटना, नवीन काहीही घडत नसल्यामुळे मरायला टेकलेली आहे. या प्रकारची सोसायटी असू शकते याचीच विद्यार्थ्यांना गंमतीशीर वाटते. नंतर हेच सर्व विद्यार्थी मिळून या सोसायटीचे पुनरुज्जीवन करतात.

प्रत्येक विद्यार्थ्यांबरोबर, शिक्षक (व पालकांनीसुद्धा) आवर्जून पाहण्यासारखा हा एक सुरेख चित्रपट आहे.

जॉर्ज ऑर्वेल लेखकाचे 'नायंटीन एटीफोर' वा एच जी वेल्सचे 'दि टाइम मशीन' वा हक्स्ले याचे 'दि ब्रेव्ह न्यू वर्ल्ड' या कादंबऱ्या वाचकांना काल्पनिक समाजात भविष्यात काय घडू शकेल याचा अंदाज वर्तविलेले असल्यामुळे वाचकांना एका वेगळया जगात नेवून सोडतात. समाजातील विसंगतीवर बोट ठेवत अतिरेकाचे उपरोधपूर्ण काळेकुट्ट चित्रण केलेल्या अशा प्रकारच्या लेखन प्रकारातील आशयाला डिस्टोपिया (युटोपियाच्या विरोधी अर्थाने) असे म्हटले जाते. या प्रकारच्या आशयावरील भयपट पाहत असताना मन सुन्न होऊन जाते. 'सारे कसे छान छान' अशा गुलछबू चित्रपटांची सवय झालेल्यांना असले चित्रपट धक्कादायक ठरतात. याच मालिकेतील **फॅरनहीट 451** हा चित्रपट असून आपल्या समाजातील दोषावरच अतिशय कठोरपणे टीका-टिप्पणी येथे केली आहे.

मूळ लेखक रे ब्रॅडबरी यानी लिहिलेल्या याच नावाच्या कादंबरीवरून या चित्रपटाची पटकथा बेतलेली आहे. 451 अंश फॅरनहीट तापमानात कुठलेही पुस्तक  पेट घेऊन जळून राख होते. या चित्रपटातील काल्पनिक समाजात पुस्तक वाचणे, जवळ बाळगणे गुन्हा ठरत असून कुठलेही पुस्तक दिसले की जळून टाकण्यासाठी यंत्रणा सज्ज ठेवलेली असते. या जाळणाऱ्या कर्मचाऱ्यांना फायरमन असे म्हटले जात असते. खरे पाहता रूढ अर्थाने फायरमनचे काम आग विझविण्याचे असते. परंतु येथे सर्व उफराटा व्यवहार. कुणाचीही पर्वा न करता हे फायरमन घर-घरातील पुस्तकं शोधून जाळून टाकतात.

माँटेग हा या यंत्रणेतील कार्यकुशल कर्मचारी. थोड्याच दिवसात त्याला पदोन्नती मिळणार म्हणून तो खूश असतो. अशाच एका पुस्तक जाळण्याच्या मोहिमेवर असताना एक लहान मुलगा ढिगामधील एक पुस्तक उचलून चाळू लागतो. वडिलांनी डोळे वटारल्यामुळे तो मुलगा परत ढिगात जाळण्यासाठी पुस्तक फेकून देतो. माँटेगला पुस्तकात असते तरी काय याचे आश्चर्य वाटते. वाटेत एकदा त्याला एक तरुणी भेटते. “तू जे पुस्तक जाळून टाकतोस ते वाचून पाहाव अस तुला वाटत नाही का?” असा प्रश्न ती विचारते. तो ठाम नकार देतो. परंतु मनाच्या कोपऱ्यात कुठे तरी अपराधीपणाची जाणीव होते. मग एकदा तो चोरून एक पुस्तक घरी नेतो. एकीकडे पुस्तकं जाळणे व दुसरीकडे डेव्हिड कॉपरफील्डसारखे  पुस्तक वाचणे असे दुहेरी आयुष्य तो जगू लागतो.

एका मोहिमेत तर एका वृद्ध महिलेच्या पुस्तकांचा प्रचंड संग्रह बाहेर काढून जाळत असताना ती स्वतःच पुस्तकाच्या ढिगाबरोबर जाळून घेते. अभिव्यक्ती आणि मुक्तविचार यांना कठोर विरोध करणाऱ्या  या भावी समाजाचे हे दृष्यस्वरूप मती गुंग करणारा आहे.

चित्रपटाच्या शेवटी मात्र माँटेगच्या मागेच इतर फायरमन अटक करण्यासाठी त्याचा पाठलाग करतात. त्याची बायकोच नवऱ्याच्या विरोधात त्या फायरमनना मदत करते.  तो जंगलात पळून जातो. तेथे गुप्तपणे राहणारी माणसं भेटतात. त्यातील प्रत्येक जण स्वतःला आवडलेले पुस्तक मुखोद्गत करत असतो. कारण जगातील पुस्तकं नष्ट जाल्यास पुढच्या पिढीसाठीची ही देणगी जपून ठेवलेली असते. त्यामुळे तेथील प्रत्येकाची ओळख लेखकांच्या नावाने केली जाते. कुणी जेन ऑस्टिन, कुणी शेक्सपीअर तर कुणी चार्ल्स डिकेन्स इ,इ. नदी काठी मरायला टेकलेला म्हतारा एका लहान मुलाला रॉबर्ट लुइस स्टिव्हन्सनची कादंबरी पाठ करून घेत होता.

फ्रॅन्स्वा त्रूफा या फ्रेंच दिग्दर्शकाने रे ब्रॅडबरीच्या कादंबरीतील गाभा पकडून विलक्षणरित्या चित्रित केला आहे. आजही जगात अनेक पुस्तके आणि त्यातून व्यक्त होणारे विचार दडपले जातात. हा चित्रपट अशांसाठी चपराक आहे.

डेझिल वॉशिंग्टन  या गुणी अभिनेत्याने दिग्दर्शित केलेला **दि ग्रेट डिबेटर्स** हा शोषक आणि शोषित यांच्यातील संघर्षावर बेतलेला एक उत्कृष्ट चित्रपट आहे. कॉलेजमधील सांघिक वक्तृत्व स्पर्धेच्या निमित्ताने वांशिक भेदाभेदातील अंतर्विरोध, संघातील स्पर्धेत भाग घेणाऱ्यांचे एकमेकाशी असलेले नाते, मतभेद, शौडशावस्थेतील ताणे-बाणे, जबरदस्त समूहभावना इत्यादींचे सुरेख चित्रण या चित्रपटात बघावयास मिळते.

चित्रपटाच्या अंतिम भागात स्पर्धेतल्या वादविवादाच्या शेवटच्या फेरीचे चित्रण फार सुरेखपणे टिपलेले आहे. अगदी शेवटच्या क्षणी, विषय बदलणे, या समूहाबरोबर शिक्षक नसणे, फोनवरून मार्गदर्शन उपलब्ध नसणे, ऐन वेळेला सर्वात लहान असलेल्या विद्यार्थ्याला संधी देणे असे अनेक गुंतागंतीतून अडथळयाची शर्यत पार करत गांधीजींचे अहिंसा, असहकार

इत्यादींचे विचार मांडून स्पर्धेत एक संघ यशस्वी होते. एक सुंदर कलाकृती बघितल्याचा आनंद मिळतो.

**ग्राउंडहॉग डे** या चित्रपटाची कथा अगदीच अफलातली आहे. पेनिसेल्व्हेनिया प्रांतात दर दोन फेब्रुवरीला ग्राउंडहॉगला – एका विशिष्ट प्रकारच्या उंदिराला - पिंजऱ्याबाहेर काढून त्याच्या हालचालीवरून तीन फेब्रुवारीपासूनचा पुढील वर्षभराच्या हवापाण्याचा अंदाज करायचा, असी एक परंपरा पाळली जाते. तेथे तो एक उत्सवच असतो. नाच, गाणी, शेकोटी, खाणे-पिणे यात रात्र कशी जाते हेच कळत नसते.

परंतु तीन फेब्रुवरी हा दिवसच उगवला नाही तर या चक्रम वाटणाऱ्या शक्यतेच्या भोवती पटकथा गुंफलेली आहे. सुरुवातीला या गंमतीदार कल्पनेच्या आणि त्यातून निर्माण होणाऱ्या गंमतीजंमतीत प्रेक्षक रममाण होतो. आणि दिग्दर्शक हळूहळू वास्तवाच्या आणि काळाच्या अर्थपूर्णतेकडे चित्रपट घेवून जातो. जर तीन फेब्रुवरी हा दिवस उजाडणारच नसेल तर दोन फेब्रुवरीला काहीही केले तरी चालेल – मौजमजांचा अतिरेक, वेगाने व बेदरकारपणे कार चालवणे, कारचा अपघात होऊन कार चक्काचूर करणे – अशी एक मानसिकता तयार होऊ लागते. कारण दुसऱ्या दिवशीचा मागमूसही नसणार त्याची एकदा खात्री झाली की माणूस काहीही करू शकतो. चोरी पकडले जाण्याची भीती नसती तर बहुतेक जण खुले आम चोरी करण्यास मागेपुढे पाहिले नसते.

चित्रपटाचे सारे कथानक व त्यातल्या त्यात त्याचे शेवट अगोदरच सांगून रसभंग करणे इष्ट ठरणार नाही.

**आय ॲम डेव्हिड** या चित्रपटाची कथा बारा वर्षाच्या एका कोवळया मुलाची आहे. युद्धकाळातील छळछावणीमध्ये हा मुलगा मोठा झालेला असतो. त्याला तेथेच त्याच्या वयाचा एक मुलगा भेटतो. तोसुद्धा काही

दिवसानी तो मरतो. एवढीच त्याला कँपची आठवण. तेथील एक गार्ड त्याला पळून जाण्यास मदत करतो. ब्रेडचा तुकडा, साबणाची वडी, चाकू, दिशादर्शक कंपास व त्यानी दिलेली एक चिठ्ठी एवढे घेवून तो पळून जातो. त्याला उत्तरेकडील डेन्मार्कची राजधानी गाठावयास सांगतो. कंपासच्या साहाय्याने तो उत्तर दिशा ओळखत राना-वनातून, नदी-नाल्याच्या काठावरून, चालत-पळत, काही वेळा कारमध्ये लिफ्ट मागून व काही वेळा रेल्वेमधून तो प्रवास करतो. पोलीस मागे लागतील या भीतीने तो स्वतःची ओळख लपवून ठेवत असतो. वाटेत काही चांगली काही वाईट लोक भेटतात. शेवटी तो डेन्मार्कला पोचतो. हा चित्रपट म्हणजे त्या अद्भुत प्रवासाची कहाणी. अखेर त्या गार्डने दिलेल्या पत्रामुळे सापडलेल्या त्या बाईला आय ॲम डेव्हिड असे सांगितल्यावर आईचे (व प्रेक्षकांचे) अश्रू आवरेनासे होतात. डेव्हिडला आपल्या आईचा शोध कसा लागला हे पडद्यावरच बघायला हवे.

अँथनी हॉपकिन्स या गुणी नटाच्या प्रभावी अभिनयाची प्रचीती देणारा **इन्स्टिंक्ट** हा एक उत्कृष्ट चित्रपट आहे.  या चित्रपटाच्या केंद्रस्थानी पृथ्वीवर माणसाने आपल्या आक्रमक व आग्रही आणि पझेसिव्ह स्वभावामुळे मांडलेला उत्पात व सृष्टी आणि सृष्टीतील प्राणी जगतावर प्रभुत्व मिळविण्याची सततची हाव आहेत. या विकृतीविरुद्ध लढणारा एक विक्षिप्त व चक्रम डोक्याच्या संशोधकाची भूमिका अँथनी हॉपकिन्स यानी वठवलेली आहे.

हा संशोधक/अभ्यासक मानववंशशास्त्राच्या अभ्यासासाठी आफ्रिकेच्या जंगलातील गोरिलाच्या भले मोठे कुटुंबाबरोबर रहायला जातो. हळू हळू ते कुटुंब याचा स्वीकारही करते. परंतु या कुटुंबावर बेछूट गोळिबार केले जाते. हा अभ्यासक गोळीबार करणाऱ्या अधिकाऱ्यावर गोरिलाच्या कुटुंब

रक्षणासाठी खुनी हल्ला चढवितो. खुनी म्हणून त्याची एका खासगी तुरुंगात रवानगी केली जाते. तेथे त्याला एप मॅन म्हणूनच ओळखू लागतात. खुनी म्हणून त्याच्यापासून चार हात दूर राहतात.  तो मौनव्रत स्वाकारल्यासारखे कुणाशीही बोलत नसतो. या मनोविकृत भयानक कैद्याचे मनोविश्लेषण करून अहवाल सादर करण्यासाठी एका मनोतज्ञाची नियुक्ती केली जाते. या मनोतज्ञाशी त्याचे जुळू लागते. तो त्याच्याशी हळू हळू बोलू लागतो. आदिम मानवी प्राण्याच्या प्रेरणाचा, इन्स्टिंक्ट्सचा  शोध  घेणाऱ्या चित्रपटाचा शेवट कसा होतो – हा कैदी कोर्टासमोर येतो का, तो निर्दोष सुटतो का – हे सर्व समजून घेण्यासाठी प्रत्यक्ष चित्रपट पहायला हवे.

लेखकाच्या मते **लाइफ इज ब्यूटिफुल** हा चित्रपट आपल्या जगण्याच्या किंवा जगण्याकडे बघण्याच्या दृष्टिकोनालाच बदलून टाकणारा आहे. पराकोटीच्या दुःखाकडे, संकटाकडेआणि वीपरीत परिस्थितीकडे सकारात्मकरित्या कसे पाहता येईल असा एक वस्तुपाठच हा चित्रपट प्रेक्षकासमोर ठेवतो. हा एक अद्भुत सुंदर चित्रपट आहे, एक अत्युत्कृष्ट चित्रपट आहे असे चित्रपट पाहून संपल्यानंतर आपोआप लक्षात येईल.

दुसऱ्या महायुद्धाच्या कालातील ही कथा आहे. सुरुवातीला अगदी खेळकर वाटणारी कथा नंतरच्या भागात डोळ्यात पाणी आणते. डोरा व ग्विडो या तरुण जोडप्याची  ही कथा. डोरा या शिक्षिकेच्या पहिल्या भेटीतच ग्विडो तिच्या प्रेमात पडतो.  तिच्या मनाविरुद्ध एका श्रीमंताशी लग्न ठरलेले असते. हा तिला चक्क पळवून नेवून लग्न करतो. तिच्या घरातले तिच्याशी अबोला धरतात. ग्विडो हा ज्यू तरुण व शिक्षिका असलेल्या डोरा यांच्यातील प्रेमाची सांगता जोशुआ नावाच्या गोड छोकऱ्याच्या जन्मात होते. ग्विडो, डोरा व जोशुआ यांचे अतीमधुर व स्वप्नवत वाटणारे त्यांचे जग असते. ग्विडो हा अगदी खेळकर, जीवनाकडे सकारात्मक दृष्टीने बघणारा असतो.

दिग्दर्शकाने भावपट वाटणारी सफल प्रेमकथा चित्रपटाच्या पूर्वार्धात उभी केली आहे.

या त्यांच्या संसारावर दुसऱ्या महायुद्धाची काळी छाया पसरते. ग्विडो ज्यू असल्यामुळे जर्मन सैनिक त्या सर्वांची छळछावणीत रवाना करतात. डोरा महिलांच्या वार्डमध्ये तर ग्विडो व जोशुआ दुसऱ्या वार्डमध्ये अशी कुटुंबाची ताटातूट होते. ग्विडो मात्र जोशुआला या छळाची झळ लागू न देता हा सर्व प्रकार एका प्रकारचा खेळ आहे असेच त्याला भासवतो. तिथे रोज घडणाऱ्या सगळ्या बऱ्या वाईट गोष्टी ग्वेडो काल्पनिक खेळाशी जोडत राहतो. जोशुआला हे सगळे गमतीदार खेळाचे भाग आहेत याची सतत खात्री पटावी यासाठी नवनव्या युक्त्या लढवत असतो, नवनवे नाटक रंगवतो.

युद्धापूर्वी ग्विडोची एका जर्मन डॉक्टराशी शब्दकोडी सोडवण्याच्य समान छंदामुळे दोस्ती झालेली असते. तो डॉक्टर त्याला छळछावणीत भेटतो. एका पार्टीच्या प्रसंगात ग्विडोला वेटर म्हणून काम करायला लावतो. जोशुआला त्या सामील करून घेतो. आपल्या बायको-मुलावरील विलक्षण प्रेम व ते व्यक्तकरणासाठी त्यानी लढविलेल्या युक्त्या-प्रयुक्त्या प्रत्यक्ष पडद्यावरच बघायला हवेत. परंतु छळाचे सावट काही दूर होत नाही. परंतु स्वतःचे बळी देवून तो जोशुआ व डोराचे मिलन घडवून आणतो.

लेखकानी म्हटल्याप्रमाणे केवळ भरपूर हसविणारा व अधूनमधून रडविणरा इतकेच या चित्रपटाचे मोल नाही. जगण्याकडे पाहण्याची एक सकारात्मक दृष्टी देणारा हाचित्रपट आहे. दुष्ट माणसं फार फार तर शरीरावर सत्ता चालवतील. पण आत्म्याचे स्वातंत्र्य आपल्यावरच अवलंबून असते. ते आपण कोणत्याही परिस्थिती अबाधित ठेवू शकतो, हेच चित्रपट सांगू इच्छित आहे.

**लाइव्हस ऑफ अदर्स** हा जर्मन चित्रपटाचा आशय अभिव्यक्ती

स्वातंत्र्याचा आहे. सरकारी सुरक्षा यंत्रणा आधुनिक व प्रगत तंत्रज्ञानाच्या सहाय्याने जनसामान्यांच्या रोजच्या जगण्यात केलेली लुडबुड व सावातंत्र्याची गळचेपी व या गळचेपीच्या विरोधात कलावंतानी केलेला संघर्ष यांचे फार सुरेख चित्रण येथे बघण्यास मिळतो. एकीकडे चित्तथरारक रहस्यकथा असलेला हा चित्रपट रहस्यपट न राहता एक समृद्ध आशयघन असलेला चित्रपट म्हणून उलगडत जातो.

अमेरिकन सिनेटमधील भ्रष्टाचाराची लक्तरे वेशीवर टांगणाऱ्या **मि. स्मिथ गोज टु वॉशिंग्टन** या चित्रपटाच्या प्रदर्शनाला अभिव्यक्ती स्वातंत्र्याचा डंका पिटणारी अमेरिकन वृत्तपत्रे आणि अमेरिकन काँग्रेसकडून प्रखर विरोध झाला होता, हे सांगूनही कुणाचाही विश्वास बसणार नाही. फॅसिस्ट प्रवृत्तीच्या काही युरोपियन राष्ट्रांनीसुद्धा या चित्रपटावर बंदीची कुऱ्हाड उगारली होती. कारण या चित्रपटात स्वातंत्र्य व लोकशाही मूल्यांना केंद्रस्थानी दाखवण्यात आले होते. प्रस्थापित राजकारण्यांना आपली भ्रष्टाचारी व्यवस्था तशीच चालू ठेवण्यासाठी सोईचा सिनेटर म्हणून दुरच्या खेडेगावातील एका साध्या भोळ्या भाबड्या सिनेटरला  वॉशिंग्टन येथे आणले जाते. कुटिल राजकीय स्पर्धकांतून तो कसा निभावून जातो याची मनोरंजक कहाणी दिग्दर्शक फ्रँक काप्रा यानी चित्रपटात सांगितली आहे.

**दि पियानिस्ट** या चित्रपटाचे दिग्दर्शन रोमन पोलान्स्की या ऑस्कर विजेत्या दिग्दर्शकाने केले आहे. एका पोलिश संगीतकाराच्या जीवनावर आधारलेल्या पटकथेवरून बेतलेला हा चित्रपट पहायलाच हवा या कॅटेगरीतला आहे. दुसऱ्या महायुद्ध काळातील सहा वर्षे हा कलावंत निव्वळ नशीबाने साथ दिली म्हणून तर कधी अनपेक्षितपणे माणुसकीने तर कधी आपल्या पियानो वादनाच्या कलेमुळे कसा जिवंत राहतो, त्याची ही अद्भुत कहाणी आहे. परिस्थितीच माणसातील चांगुलपण  आणि वाईटपण ठरवते,

याचे दर्शन पोलान्स्की प्रेक्षकांना घडवतो. पटकथेत अनेक वळणं असले तरी त्या नाट्यमय प्रसंगात संगीत वा क्लोजअप्सच्या भानगडीत न पडता दिग्दर्शक *आहे ते असे आहे* असे पारदर्शकरित्या क्रूर तटस्थपणे आपल्या समोर ठेवतो.

आपल्या येथील चित्रपटातील प्रेम म्हणजे धो धो पडणाऱ्या पावसात ओले-चिंब झालेल्या नायक-नायिका, नाच-गाणी, असेच काही तरी बघायला मिळते. थोडक्या प्रेम सोडून सर्व काही त्यात असते. परंतु दि रोड होम या चायनीज चित्रपटात प्रेमकथा असूनसुद्धा नाच-गाणी तर नाहीतच पण नायक-नायिका, खलनायक-नायिकासुद्धा नाहीत. रस्मे-रिवाज, बेरेहम समाज, खानदान की इज्जत, गरीब-श्रीमंत इत्यादी गल्लाभरू मसालासुद्धा त्यात नाही. कंटाळा घालवण्यासाठी बाष्कळ विनोद नाहीत. मेरी माँ, बहन म्हणत धाय मोकलून म्हटलेले रडगाणे नाहीत. वारंवार मन भरून याव, गालावर आनंदाश्रू ओघळावीत अशी एक अप्रतिम प्रेमकथा **रोड होम** मध्ये चित्रित केले आहे.

चित्रपटाची सुरुवात शहरात काम करणाऱ्या एका तरुणाच्या निवेदनातून होते. त्याचे वडील मृत झालेले असल्यामुळे अंत्यसंस्कारासाठी आपल्या खेड्याकडे जाताना केलेल्या निवेदनातून फ्लॅशबॅक पद्धतीने कथा उलगडत जाते. त्याच्या आईची ही विलक्षण प्रेमकथा आहे. चीनमधील ग्रामजीवनाचे परंपराचे आणि मानवी भावभावनांचे तपशील भरत ही कहाणी सांगितली जाते. उमद्या मनाच्या एका निष्ठावान शिक्षकाच्या प्रेमात तरुण वयातील त्याची आई पडते. हा नवा तरुण शिक्षक गावकऱ्यांच्या मदतीने शाळा बांधायला लागतो. गावातील महिलाएकेका माणसाचे जेवण आणून टेपलावर मांडत असतात. या तरुणीला शिक्षकाना आपलेच ताट उचलावे असे वाटत असते. त्याचे दर्शन व्हावे म्हणून लांबच्या विहिरीवर पाणी

भरायला जाते. त्याचा आवाज ऐकू यावा म्हणून शाळेच्या बाहेर ती रेंगाळते.

यात नाच नाहीत, गाणी नाहीत, प्रणय प्रसंग नाहीत. एकमेकांच्या बोटांचा ओझरता स्पर्शही नाही. विलक्षण, सुंदर निसर्ग चित्रण. त्याच्या जोडीला संगीत व हे प्रेमी युगुल, अशी एक सुंदर भट्टी येथे जमलेली आहे.

या लेकीच्या प्रेमातील सच्चेपणा ओळखल्यानंतर तिची म्हातारी आई लग्नाला होकार देते. शिक्षकालाही हे प्रेम उमजते. एक हेअरपिन देऊन ती तो व्यक्त करतो. राजकीय चौकशीमुळे अचानकपणे त्याला गाव सोडून जावे लागते. ही वेडीपिशी होऊन जिवाच्या आकांताने त्याचा शोध घेण्यासाठी डोंगरदऱ्यात पोचते, वाटेत मूर्छा येऊन पडते. जेव्हा तिला तिचा प्रियकर तिच्यासाठी परत आलेला कळते तेव्हा हा विरह व वाट पहाणे संपते.

आज त्याचा मृत्यु झाला आहे. व त्या तरुणाची आई त्याचे अंत्यसंस्कार गावातच पारंपरिक पद्धतीने व्हायला हवे असे हट्ट करते. परंतु एवढे लांब पायी पायी त्याचे प्रेत शहरातून गावाकडे नेणे सोपे नसते. तरीसुद्धा शेजारच्या गावातील माणसं भाड्याने घेऊन आईची इच्छा पुरी करायचे असे तो ठरवतो. हा शिक्षकही लोकप्रिय असल्यामुळे सर्व जण उत्स्फूर्तपणे शेकडो गाड्या करून शहरातून त्या बर्फाळ प्रदेशातील खेड्यात पोचतात. आईसुद्धा अश्रू गाळत बर्फातला मैलोनमैलाचा प्रवास करते.

नव्याजुन्यातला हा फरक बघताना आपण अंतर्मुख होतो. संपूर्ण चित्रपटात दाखवलेला खोटा आणि भडक रंगाचा वर्तमानकाळ आणि प्रेम व माणुसकीने भरलेला भूतकाळ यातील फरक अर्थपूर्ण ठरतो.

**शटर आयलंड** हा एक भन्नाट सायको थ्रिल्लर आहे. कदाचित दिग्दर्शक मार्टिन स्कॉर्सेसी यानी हिचकॉकला वाहीलेली ही आदरांजली असावी. हिचकॉकच्या चित्रपटाप्रमाणे येथेही रहस्य, भीती, व उत्कंठा यांचा लपाछपीचा खेळ आहे. राक्षस म्हणून जगत राहणं चांगल का चांगला माणूस

म्हणून मरून जाणं बरं या संभ्रमात शेवटपर्यंत ठेवणारा हा चित्रपट बघायलाच हवा अशी शिफारस लेखक करत आहे.

शटर आयलंड या बेटावरल्या मनोरुग्ण केंद्रातून तीन मुलांचा खून करणारी स्त्री अतिशय रहस्यमयरित्या बेपत्ता झालेली आहे.  त्याचा तपास करायला फेडरलचे दोन अधिकारी  या आयलंडवर येतात. परंतु त्यांना तुरुंगाचा मुख्य अधिकारी, तेथील अधिकारी वर्ग, हॉस्पिटलमधील डॉक्टर्स, नर्सेस सहकार्य देत नाहीत. धोकादायक रुग्णांना ठेवलेल्या सी वार्डमध्ये प्रवेशही देत नाहीत. या केंद्रातच काही तरी भयानक कारस्थान चालू आहे असा संशय मुख्य तपासाधिकाऱ्याला येतो. त्या अधिकाऱ्यालाच एका प्रकारचे औषध देत त्याच्यात  भ्रम निर्माण केले जात असते. त्याला नको त्या आठवणी दिसू लागतात, मृत बायको त्याच्याशी बोलत आहे असे त्याला वाटू लागते. तपास करताना बेपत्ता झालेल्या महिलाच्या खोलीत एक रहस्यमय चिठ्ठी सापडते. त्यात लॉ ऑफ फोर फॉर सिक्स्टी सेव्हन असे लिहिलेले असते. केंद्रात फक्त सहासष्ठ रुग्ण असताना हा सदुसष्टावा कैदी कोण हा प्रश्न त्याला पडतो. तो वैतागलेला असताना ती बेपत्ता झालेली महिला सापडली असे मुख्य अधिकारी सांगतो. परंतु खऱ्या स्त्रीऐवजी दुसरीच कुणाला तरी तेथे उभे केलेली असते. मुलाखत घेत असताना ही स्त्री मधुर संभाषण करत असतानाच हिंस्त्र होते. तपासाधिकारी बुचकळ्यात पडतो. शोध घेत घेत तो समुद्रालगतच्या गुहे पर्यंत पोचतो. त्याला तेथे खरी स्त्री भेटते. तिच्याकडून बेटावरील मानसिक रुग्णांवर भयानक प्रयोग केले जात आहेत, त्याची इत्थंभूत माहिती मिळते. त्या अधिकाऱ्यालाच मानसिक रुग्ण ठरविण्याचे प्रयत्न केले जातात. मग गुन्हेगार कोण? डॉक्टर कोण? त्या बेटावर नक्की काय चाललेले असते? कुणाच्या परवानगीने? या सगळ्याचा रहस्यभेद मात्र विलक्षण कलाटणी देणारा आहे. चित्रपटाचा वेग आणि उत्कंठा कायम

ठेवणारा हा चित्रपट उत्कृष्ट ठरतो तो याच कारणामुळे.

अब्बास किरियोस्तामी या इराणी चित्रपट दिग्दर्शकाचा **टेन** हा संपूर्ण चित्रपट फक्त एका कारमध्ये घडतो. ड्रायव्हिंग करणारी सुंदर, स्मार्ट आणि बुद्धिमान तरुणी आणि तिच्याबरोबर शेजारी बसणारे विविध जण यांच्या संभाषणामधून पटकथा उलगडत जाते. ही स्त्री व दुसरे कुणीतरी यांच्यात संवाद होतात ते दहा भाग म्हणजे चित्रपटाचे शीर्षक टेन.

पहिल्या भागातील संवाद तिच्या 10-12 वर्षाच्या मुलाबरोबरचा असतो. हा पोरगा आईवर चिडचिड करतो, वैतागतो, वैतागत आईवर ओरडत असतो. कारण आपली आई वडिलाशी घटस्फोट घेतली आहे. रागारागने तो उतरतो. नंतरच्या भागात तिची बहिण, एक म्हातारी स्त्री, एक वेश्या, एक मैत्रिण, एक अनोळखी स्त्री तिच्या कारमध्ये येतात, ती त्यांना लिफ्ट देते. ती त्यांच्याबरोबर संवाद साधते. त्या गप्पामधून तिची कहाणी प्रेक्षकांना समजू लागते. त्याचबरोबर स्त्री जातीच्या व्यथासुद्धा उघडे होऊ लागतात.

चित्रपट संपतो तेव्हा आपण काय पहात होतो त्यावर विश्वास बसत नाही. जगभर पुरुषाची अरेरावी आणि मग्रूरी सारखेच असते, हे आपल्याला कळू लागते. एखादी स्त्री आपले व्यक्तिमत्व, आपला स्वाभिमान समजून घेते, हेही आपल्याला कळते. त्या समजुतीच स्त्रियांनाही आत्मभान देऊ शकतात, हे पाहून आपण नक्कीच प्रभावित होतो.

सिएरा माड्रे या मेक्सिकोतील पर्वतराजीत दडलेल्या सोन्याच्या साठ्याचा शोध व त्यापोटी होत असलेला माणुसकीचा ऱ्हास 1948च्या **ट्रेझर ऑफ सिएरा माड्रे** या चित्रपटाचा गाभा आहे. ज्याला सोनं मिळतय तो माणूस कधीच श्रीमंतीत मरत नाही. कारण सोनं माणसाला भ्रष्ट करते. मुळात सोनं सापडेपर्यंत मैत्री, नातीगोती सगळे ठीक असतात; पण एकदा सोनं सापडलं की सर्व समीकरणं बिघडत जातात.

मेक्सिकोतील एका गावातील दोन बेकार तरुण कसे तरी दिवस ढकलत असतात. त्यांची गाठ एका अवलिया म्हाताऱ्याशी पडते. तो म्हातारा सोन्याच्या खाणीचा शोध घेण्याच्या मोहिमांविषयीचे चित्तथरारक अनुभव सांगत असतो. आयुष्याला कंटाळलेल्या या बेकार तरुणांना ही कल्पना आकर्षक वाटते.  त्या म्हाताऱ्याला घेऊन ते खाणीच्या शोधात जातात व त्यांना सोने मिळतेही. परंतु सोन्यासंबंधीचे म्हाताऱ्याचे माणसं भ्रष्ट होण्याचे बोल खरे ठरत होत जातात. आपल्या वाट्याचे सोने सतत लपवून ठेवायचे, दुसऱ्याचे लपवलेलेल सोने हस्तगत करायचे, असे प्रकार त्यातील एक तरुण करू लागतो. हा मोह वाढत जात त्याचे द्वेषात रूपांतर व पार सहकाऱ्याचा जीव घेण्यच्या प्रयत्नापर्यंत मजल जाते. हळू हळू त्यचे मानसिक संतुलन बिघडत जाते. दुसरा तरुण मात्र याच्या उलट प्रवास करणारा असून मित्राचा सामना करतो. सोन्यासाठी दरोडेखोर व तेथील मूळ रेड इंडियन्स जमाती यांचाही सामना या तरुणांना करावा लागतो. परतुं दुसऱ्या तरुणाच्या संवेदनशील वागणुकीमुळे ते दोघे व म्हातारा तेथून सहीसलामत सुटतात. परंतु ज्या सोन्यासाठी हे सर्व घडते ते तर शेवटी त्या तिघांच्याही हाती लागत नाही. तेथून निगताना म्हातारा हा डोंगर जसा होता तसाच ठेवण्याची जबाबदारी आपला आहे असे सांगतो. यात निसर्गासमोर एका प्रकारची हतबलता व्यक्त होते. जे जे अनिष्ट ते मानवी स्वभावातूनच होते, हे दाखविण्यात दिग्दर्शक व येथील पात्रे यशस्वी झालेले जाणवते.

चॅर्ली चॅप्लिनच्या चित्रपटांची आठवण करून देणारा **उम्बर्टो डी** हा चित्रपट खरे पाहता नववास्तववादी लाटेतला एक महत्वाचा चित्रपट आहे. चॅप्लिनप्रमाणे पोट धरून  भरभरून हसणे व काही वेळा अंतर्मुख होण्यास लावणे हा प्रकार उम्बर्टो डी या चित्रपटात नसला तरी तोच गडद अनुभव हा चित्रपट देतो. एकीकडे मन विषण्ण करणारे प्रसंग व त्याच वेळी खोल

कुठेतरी आशेचे किरण असा ऊनपावसाचा खेळ पडद्यावर आपण बघू शकतो.

उम्बर्टो डी नावाच्या वयोवृद्ध पेन्शनर आणि त्याच्या लाडक्या कुत्र्याची (व तेथेच घरकाम करणाऱ्या एका तरुणीची) मनाला चटका देणारी ही कहाणी आहे. त्या पेन्शनरची परिस्थिती फार बिकट आहे. त्याच्या घराची मालकीण भाडे थकल्यामुळे त्याला घराबाहेर घालणार आहे. पेन्शन वाढवा म्हणून शहरातील सर्व पेन्शनर मोर्चा काढतात. हासुद्धा जिवाभावाच्या कुत्र्याबरोबर त्या मोर्च्यात सामील होतो. पोलीस धरपकड करतात. फसलेल्या मोर्चामधून घरी परत आल्यानंतर बघतो तर त्याची खोली तासाच्या भाड्याने कुणा टेंपररी जोडप्याला वापरायला मालकिणीने दिले आहे, असे त्याला कळते. म्हातारा संतापतो. पण करणार तरी काय? बाडबिस्तारा व कुत्र्यासकट बाहेर पडतो. तेथेच घरकाम करणारी तरुणी त्याची काळजी घेते. परंतु तिच्याही काही समस्या कमी नाहीत. दोन सैनिक मित्राबरोबर तिचे संबंध आहेत. ती तीन महिन्याची गरोदर आहे. म्हाताऱ्याचा घसा दुखत आहे. म्हणून घाबरून त्या रात्रीच्या वेळी सरकारी दवाखान्यात घेऊन जाते. बरे झालेले तेथील अनेक रोगी फुकट रहायले मिळते म्हणून दवाखान्यातच रहात असतात. हा म्हतारा मात्र त्या मोहात न पडता तेथून बाहेर पडतो. म्हातारा वैतागलेला असतो. कुत्र्याला रस्त्यावर सोडून स्वतः आत्महत्या करायचा मनाशी ठरवतो. पण कुत्र्याचे हाल पाहून  तो बेत रद्द करतो. कुत्र्याला पोटाशी घट्ट धरून रेल्वेखाली उडी मारण्याचा प्रयत्न करतो. परंतु रेल्वेच्या धडधडाटाने उडी मारून कुत्रा पळून जातो. कुत्र्याचा मालकावरील विश्वास उडतो. नंतर काय होते, यासाठी प्रत्यक्ष चित्रपट पाहायला हवे.

जगण्याचा पेच अनाकलनीय व अन्याकारक वाटत असला तरी

जगण्यावरचे प्रेम हाच जगण्याचा एकमेव मार्ग आहे, हेच जणू हा चित्रपट मनावर ठसविण्याचा प्रयत्न करत आहे की काय असे शेवटी वाटू लागते.

लेखकाच्या मते अतिशय प्रभावी आणि शेवटपर्यंत मनाची पकड घेणारा **वूल्फ ऑफ वॉल स्ट्रीट** हाही एक उत्कृष्ट चित्रपट आहे. अमेरिकेतील सट्टा बाजारातील ही कहाणी जणू काही पैसा कमविण्यात (व त्याची उधळपट्टी करण्यात) विधीनिषेध बाळगण्याची गरज नाही; अफाट पैसे मिळवून मनावरील ताण सहन करण्यासाठी मद्य, ड्रग्ज आणि सेक्सच्या आहारी पडण्यात काही गैर नाही, असे सांगत आहे की काय असे वाटू लागते. भौतिकतेचा अतिरेक आणि छंदीफंदी जीवनशैलीचे चित्रण असले तरी शेवटी बरेचसे गुन्हेगार तुरुंगाची हवा खातात व मुक्तपणे आयुष्य जगणारा शेवटी सोबर होऊन मार्केटिंग विषय शिकवणारा शिक्षक होतो.

गंमत म्हणजे चित्रपटाचा दिग्दर्शक, मार्टिन स्कोर्सेसी हे सर्व तटस्थपणे मांडतो. आजच्या टोकाच्या भौतिकतेने पछाडलेल्या अमेरिकेची मानसिकता पडद्यावर साकारताना दिग्दर्शक कुठल्याही प्रकारे स्वतःचे मत व्यक्त करत नाही. चित्रपटातली ही कमालीची तटस्थता फार बोलकी आहे, हे प्रेक्षकांच्या लक्षात राहते.

कुटुंबाप्रतीचे कर्तव्य आणि प्रेम या चिरंतन मूल्याभोवती फिरणारा **व्हाट्स ईटिंग गिल्बर्ट ग्रेप** हा एक भावमधुर चित्रपट आहे. टीअरशेडिंग, आदर्शवादी, बाळबोध वळणाचासुद्धा नाही. सुरुवातीला कारुण्याची झालर असली तरी उगीच फापटपसारा नाही. एक छान, सुंदर चित्रपट बघितल्याचा आनंद मिळतो.

वीस-बावीस वर्षांचा तरुण जेमतेम हजारेक घरं असलेल्या गावात रहात असतो. बाप नाही, आई स्थूलपणाने आजारी, दोन बहिणी आणि एक अठरा वर्षाचा मतिमंद भाऊ हे त्याचे कुटुंब. मोडकळीस आलेल्या घराला

सांभाळणारा हा तरुण कुटुंबापलिकडे दुसरा कुठलाही विचार करू शकत नाही. त्याच्या आयुष्यातील थोडासा रोमँटिक बदल म्हणजे एका श्रीमंत पण नवऱ्याकडून दुर्लक्षित असलेल्या बाईबरोबरचे चोरटे लैंगिक व्यवहार. आयुष्यात आनंद, उमेद वाटण्यासारखे काहीही नाही.

रंगहीन, स्वादहीन अशा त्याच्या आयुष्यात मंदवाऱ्याच्या झुळकाप्रमाणे एक तरुणी येते व त्याचे जगच बदलू पाहते. मतिमंद भाऊ म्हणजे ओंगळ, हास्यास्पद चाळे करत हास्यनिर्मिती करणारा वोड नसून कुटुंबातील सर्वांचा व त्या तरणीचाही लक्ष वेधून घेणारा असतो. विसंगतीने भरलेल्या या कुटुंबाचे नंतर काय होते हे पडद्यावरच बघायला हवे.

अमानुष, अघोरी व अश्लाघ्य अशा प्रथाविषयींची मांडणी करणारा **मूलाडे** हा एक अप्रतिम चित्रपट आहे. पश्चिम आफ्रिकेतील एका खेड्यातील हे चित्रण आहे. निरक्षरता, अडाणीपणा आणि अंधश्रद्धेचे प्राबल्य असलेल्या या छोट्याशा खेड्यात पुरुष परिषदेची सत्ता चालत असते. या परिषदेची पंचायत सर्व निर्णय घेत असते. त्यांच्या अमानुष परंपरेत स्त्रियांचे शुद्धीकरण हा महत्वाचा अजेंडा असतो. या पारंपरिक प्रथेप्रमाणे, प्रत्येक मुलीचे अगदी लहानपणी, पाचव्या-सहाव्या वर्षी, तिच्या योनीचा काही भाग तीक्ष्ण चाकूने कापून टाकून नंतर शिवायचे ही ती पद्धत होती. या शुद्धीकरणात कित्येक मुलींचा जीवही जात असले तरी त्याची पर्वा केली जात नसे. उरलेल्यांना आयुष्यभर वेदना सहन करावे लागत होते. स्त्रियांनी कुठलेही लैंगिक सुखाचा आनंद घेता कामा नये हा त्या मागचा उद्देश. पुरुषाच्या आनंदात स्त्रीला कितीही वेदना आणि त्रास झाला तरी चालेल, ही मानसिकता. अशा शुद्ध मुलींचा विवाहच समाजसंमत असेल. त्यामुळे प्रत्येक आईला नाइलाजाने आपल्या मुलीच्या योनीची चिरफाड करण्यासाठी संमती दिल्याविना दुसरा पर्यायच नसतो. परंतु एक तेजस्वी स्त्री याविरुद्ध बंड करते. तिच्या मुलीचे ती

शुद्धीकरण होऊ देत नाही. नंतर ती मुलगी मोठी होऊन शिकून परत येते. एका शिक्षित तरुणाच्या प्रेमात ती पडलेली असते. त्यांना लग्न करायचे असते. परंतु त्यांच्या लग्नाला हे शुद्धीकरण अडसर ठरते. ही तरुणी ते सर्व कसे निभावून नेते, हे प्रत्यक्ष पडद्यावर पहायला हवे.

जिथे पर्यायच नसतो, तिथे बंड उभे राहते, क्रांती होते, लोक पेटून उठतात. या पार्श्वभूमीवरचा मुलाडे हा आफ्रिकन चित्रपट आहे. दिग्दर्शकाने कुठेही भडकपणा न आणता चित्रित केले आहे. अंगावर येणारे वास्तवच प्रेक्षकांना जास्त अस्वस्थ करते, यातच या चित्रपटाचे श्रेष्ठत्व आहे. या प्रकारच्या कहाण्यांना देश-काळाचे बंधन नसते. पती मेल्यावर ढोलताश्याच्या कर्कश आवाजात जिवंत पत्नीला जळत्या चितेवर ढकलले जाणे, किंवा विद्रूप करून उरलेले आयुष्य जगायला लावणे, एखादीला चेटकीण म्हणत दगडांनी ठेचून मारणे इत्यादी गोष्टी इतिहासाने बघितले आहेत. म्हणूनच हा चित्रपट फक्त आफ्रिकेतला न राहता  सर्व देशातील स्त्रियाविरुद्धच्या प्रथाबद्दल विचार करण्यास भाग पाडतो. चित्रपटात कुठेही बटबटितपणा नाही. बारीकसारीक तपशिलातून चित्रपट उलगडत जातो.  चित्रपटाचा एकसंध व सलग परिणाम होत असल्यामुळे चित्रपट संपला तरी आपल्या मनात तो चालूच राहतो. स्त्रियांच्या व्यथा मांडणारा मुलाडे अनेक दिवस पिच्छा न सोडणारा चित्रपट आहे.

**इन अ बेटर वर्ल्ड** हा डॅनिश चित्रपट नैतिकता, सूडभावना, क्षमा, प्रेम, हिंसा इत्यादी मानवी स्वभावांचा अत्यंत उत्कटतेने शोध घेणारा चित्रपट आहे. एका डेनिश खेड्या मानवीमूल्यांची कदर करणारा एक डॉक्टर तेथील एका कँपवरील आफ्रिकन स्थलांतरित रुग्णावर उपचार करत असतो. गावातील स्थानिक गुंडांचाही त्रास त्याला सहन करवा लागतो. बिग् मॅन म्हणवून घेणारा गुंड मानसिक विकृतीने पछाडलेला असतो. गावातील

गर्भवती स्त्रियांकडे बघून मुलगा होणार की मुलगी अशी पैज लावत तो फिरत असतो. आपली पैज तपासण्यासाठी प्रसूतीची वाट न पाहता चाकून पोट फाडून गर्भ तपासणे हा त्याचा छंद. यात कित्येक मुली दगावतात. हा डॉक्टर कित्येकांना आपल्या कौशल्याने वाचवतो.

त्याचे स्वतःचेही कौटुंबिक समस्या आहेत. या डॉक्टरचा थोरला मुलगा भलताच भित्रा असल्याने शाळेत त्याला चिडवतात, चेष्टा करतात, हैराण करत असतात, टर उडवतात. त्याची रॅगिंग करत असतात. त्याच्या वर्गात एक नवीन मुलगा येतो. मातृवियोगाने मुलगा एकलकोंडा असतो. आईला न वाचविल्याबद्दल त्याचा वडिलावर राग असतो. अशा आक्रमक व हिंसक असलेल्या मुलाचे संरक्षण या भित्र्या मुलाला मिळते.

या दोन्ही मुलांबरोबर डॉक्टर जेव्हा एका पार्कमध्ये बसलेला असतो, तेव्हा एक गुंड येऊन डॉक्टरला मारतो. डॉक्टर मात्र शांतपणे मार सहन करतो. ही दोन्ही मुलं त्यावरून त्याला छेडतात, डिवचतात.  परंतु डॉक्टर  हिसेचा फोलपणा व हिसेची निरर्थकता आणि अहिसेच्या शौर्याविषयी पटवून देण्याचा प्रयत्न करतो. पुन्हा एकदा त्या गुंडाच्या तावडीत स्वतःहून जातो व धैर्याने गुंडगिरीचा सामना करतो. बिग् मॅनने जखमी केलेल्या मुलीवर उपचार करतो. पायाला मरणप्राय इन्फेक्शन झाले म्हणून वेदनेने विव्हळणाऱ्या बिग् मॅनवरदेखील उपचार करतो. ज्या तडफदारपणे बिग् मॅनला बंदूकधारी साथीदारांना कॅंपबाहेर हाकलून द्यायला लावतो तेव्हा आपल्यासारख्या प्रेक्षकांना गांधीजींच्या तत्वज्ञानाची आठवण येते. जेव्हा एकदा कॅंपमधल्या दगावलेल्या मुलीबाबत विकृतपणा करतो तेव्हा हाच डॉक्टर त्या बिग् म२नला फरफटत नेत संतप्त जमावाच्या हवाली करतो.

अर्थात त्या नवीन मुलाला डॉक्टरचे हे तत्वज्ञान पटत नाही. दोन्ही मुलांनी स्फोटकाच्या मदतीने गुंडांची मोटर उध्वस्त करण्याची योजना आखतात.

त्यात ती मुलं दगावण्याचाही धोका असतो. त्या गुंडाचे, त्या मोटारीचे काय होते, ती मुलं जगतात का, कुठल्या सकारात्मक वळणावर चित्रपटाचा शेवट कसा होतो, हे सर्व प्रत्यक्ष पडद्यावरच बघायला हवे, असे लेखकाला वाटते. वैचारिक चित्रपट असूनही शेवटपर्यंत उत्कंठावर्धक ठेवण्यात दिग्दर्शक यशस्वी झाल्याचा आनंद आपल्याला मिळतो. अतिशय अस्वस्थ करणारा हा चित्रपट नैतिकता, क्षमा, अहिंसा या चिरंतन मूल्यांबरोबरच पालकांचे मुलांबरोबर, मुलांच्या नात्यावर, मुला-मुलामधील मैत्रीवर दिग्दर्शक काही सांगू इच्छितो. या नात्यामध्ये मुलांचे मानसिक जडणघडण किती मोलाचे असतेयाचेही आपल्याला दर्शन होते.

अलेहांद्रो गोंजालेज या मेक्सिकन दिग्दर्शकाचा **बर्डमन** हा चित्रपट रचना, आशय व परिणाम या दृष्टीने फार आगळावेगळा चित्रपट आहे. स्पायडरमन, बॅटमन टाइपचा बर्डमन हा एकेकाळचा व्यावसायिक नट. उतारवयात सर्व बाजूने कोंडलेला असतो. पत्नीबरोबरचे संबंध दुरावलेले, ड्रग्जच्या आहारी गेलेली मुलगी, शिवाय नट म्हणून कुणाच्याही खिजगणतीत नसलेला हा बर्डमन शेवटचा उपाय म्हणून एक नाटक लिहितो, दिग्दर्शन करतो व त्यातील एक महत्वाचा पात्र म्हणून रंगमंचावर येण्याचा तो विचार करतो. नाटकाच्या तालमीच्या वेळी एक नट अपघातात जायबंदी होतो म्हणून दुसऱ्या त्या तोडीचा नट शोधण्याची जबाबदारी बर्डमनने त्याचा सल्लागार, मॅनेजर व अभिनेत्या मित्रावर सोपवतो. हा मित्र एका गाजलेल्या परंतु चक्रम असलेल्या एका अभिनेत्याला याच्या समोर उभा करतो. काही निवडक प्रेक्षक व समीक्षकासमोर रंगीत तालीम करत असताना हा अभिनेता भरपूर गोंधळ घालतो. व ग्मत म्हणजे त्याचेच जास्त कौतुक होते. हा अभिनेता पुन्ह पुन्हा बर्डमनचा सुपरहिट सिनेमा बनवू असे म्हणत  असतो. एक नामांकित नाट्यसमीक्षक पूर्ण नाटक न पाहता ते पाडू अशी धमकी देते. तिच्या मते

हॉलिवुडचे नट बंडल अबिनेते असतात. बर्डमन फार अस्वस्थ होतो.

शेवटी प्रत्यक्ष नाटकाच्या  प्रयोगातील आत्महत्येच्या दृश्यात बर्डमन खोट्या बंदूकऐवजी खरी बंदूक वापरून स्टेजवर स्वतःवर गोळी मारून घेतो. परंतु हॉस्पिटलमध्ये अॅड्मिट केल्यावर गोळी नाकाला चाटून गेल्याचे कळते व बर्डमन वाचतो. नाट्यसमीक्षक नाटकाची वारेमाप स्तुती केलेले लेख पेपरमध्ये लिहिते. खुष झालेला या बर्डमन मधून बाहेर पडतो व समाधानी मनाने आकाशाकडे बघत राहतो.

अशा या अनिर्णायक संभ्रमात टाकणाऱ्या चित्रपटात अनेक आयाम आहेत. आकाशाकडे बघणे म्हणजे मृत्युनंतरचे स्वप्नदृश्य वा अभिनेत्याची मुक्ती वा इतर काही तरी असे अनेक पदर आहेत. कलेच्या अस्सलपणाचे व बाजारूपणाचे आशय दाखविणारा हा चित्रपट समजायला अवघड वाटत असला तरी अन्वयार्थ शोधणे हादेखिल अव्हान असू शकते, या लेखकाच्या मताला आपणही सहमती दर्शवितो.

य़ा पंचवीस उत्कृष्ट चित्रपटातील आशयाविषयीच्या टिप्पणी बरोबर लेखकाने दोन परिशिष्ट जोडले आहेत. एका परिशिष्टात तथाकथित दुर्बोध चित्रपट वा एकूण कलाप्रकार समजून का घ्यावे या बद्दलची लेखकाची मतं आहेत. प्रथमदर्शनी अनाकलनीय (व काही वेळा कंटाळवाणे) वाटणारी कलाकृतीची चिकाटीने मागोवा घेतल्यास, पुन्ह पुन्हा आस्वादल्यास आणि जाणकाराने तिच्याबद्दल जे लिहिले आहे ते वाचल्यास  ती हळू हळू उलगडायला लागते व तो अनुभव अवर्णनीय असतो. काही कविता, पेंटिंग्स, वा चित्रपट पहिल्या पहिल्यांदा कळत नाहीत म्हणून आपण त्याच्या वाट्याला जात नाही व हलके फुलके कलाकृतीवर समाधानी असतो. परंतु आपण कुठल्या अनुभवाला पारखे झालो होतो हे या कलाकृतीच्या आत थोड्या परिश्रमाने डोकावल्यानंतर कळू लागते. अजून एका परिशिष्टामध्ये

चित्रपटाचे अन्वयार्थ आणि दिग्दर्शकाचा दृष्टिकोन याबद्दल लिहिलेले आहे. काही मूलभूत भावना, मूल्ये, आणि विचार इतके वैश्विक असतात की स्वतंत्र प्रज्ञेचे कलावंत आपल्या प्रतिभेने ते साकार केल्यानंतरच आपल्याला अतीव आनंद देतात, असे लेखकाला वाटते. काही उत्कृष्ट चित्रपटातील बारकाव्यांचा उल्लेख करून लेखक आपले म्हणणे पटवण्याचा प्रयत्न करतो.

वैश्विक स्तरावर सर्वश्रेष्ठ ठरलेल्या चित्रपटांची ओळख करून देताना लेखक काही लक्षणांचा उल्लेख करतो. चांगल्या चित्रपटात प्रेक्षकानुनय पूर्णपणे टाळले जाते, परंतु ते प्रेक्षकाभिमुख असतात. प्रेक्षकाच्या सर्जनशीलतेला आव्हानात्मक असतात. श्रेष्ठ चित्रपट वास्तवाचे तटस्थ चित्रण करतात. चित्रपट जगाची विभागणी केवळ सुष्ट वा दुष्ट अशा काळ्या पांढऱ्या रंगात न रंगवता सुष्टाच्या मनातील दुष्टपणा वा दुष्टाच्या मनातील चांगुलपणाही दाखवतात. व येथे समबल मानवीमुल्यांचा संघर्ष असतो. श्रेष्ठ चित्रपट प्रेक्षकावर निष्कर्ष लादत नाहीत तर प्रेक्षकाला विचार प्रवृत्त करतात. हे चित्रपट मानवी आत्मभानाची कहाणी सांगत असतात. उत्कृष्ट चित्रपटात जे दिसते व ऐकू येते त्यापेक्षा अधिक काहीतरी प्रेक्षकाच्या मनात निर्माण करत असतात. हे चांगले चित्रपट स्थलातीत व कालातीत असतात.

लेखकानी आखून घेतलेले हे मापदंड त्यानी वर्णन केलेल्या चित्रपटाबद्दल तंतोतंत जुळतात, हे संपूर्ण पुस्तक वाचताना जाणवते. चित्रपटांना कलाकृतीच्या उंचीवर नेणारे हे एक संग्राह्य पुस्तक आहे.

**पडद्यावरचे विश्वभान**

*संजय भास्कर जोशी*

मौज प्रकाशन गृह

किमत 350 रु, पृ. सं 176

# विज्ञाननिष्ठ अरविंद गुप्ता

"तुमच्या मुलाने खेळणी मोडली नाही तर तो खेळलाच नाही" असे कुणी म्हटले तर कदाचित तुम्ही त्याला वेडे तरी ठरवाल किंवा एक विक्षिप्त वैज्ञानिक वा विचारवंत तरी ठरवाल. अरविंद गुप्ता हे असेच एक व्यक्तिमत्व! विज्ञान खेळणी बनवण्यासाठी आणि गावोगाव भटकण्यासाठी गले लठ्ठ पगाराच्या नोकरीला लाथ मारणाऱ्याला आपण नक्कीच वेडा ठरवू. परंतु विज्ञान प्रसाराचे काम उभारायचे असल्यास त्यासाठी हा वेडेपणाच कामी आला असे अरविंद गुप्तांचे मूल्यमापन केल्यास म्हणता येईल.

संधी असूनही तथाकथित 'यशस्वी' आयुष्याकडे पाठ फिरवून स्वतःची वाट धुंडाळणाऱ्यांच्याबद्दल आपण ऐकतो, वाचतो. ती वाट काच-खळग्यानी भरलेली आहे हे माहित असूनसुद्धा ती व्यक्ती त्या वाटेने जाते व या प्रवासात मानसिक तोल ढळू न देता समाधानाने व शांत चित्ताने अडचणींचा सामना करत असते. अशा प्रकारची व्यक्तिमत्व आठवत असताना आपल्या डोळ्यासमोर महात्मा गांधीजी उभे राहतात. तसेच अशा प्रकारच्या कित्येक व्यक्तिमत्वाबद्दल, त्यांच्यातील अक्षय ऊर्जाश्रोताबद्दल आपल्याला अभिमान वाटत असतो. त्यांच्याबद्दल भरभरून बोलावेसे वाटत असते, ऐकावेसे वाटत असते. अशाच काही मोजक्या व्यक्तिमत्वापैकी अरविंद गुप्ता हे नाव असून त्यांना 'वैज्ञानिक खेळण्यांचा जादूगार' म्हणून आख्खा महाराष्ट्र ओळखत आहे. महाराष्ट्रातील शाळा-शाळामध्ये हे नाव चांगलेच परिचित आहे. कानपूर आयआयटीतील इंजिनियरिंग पदवी असूनसुद्धा अरविंद गुप्ता मुलांसाठी कचऱ्यातून स्वस्त वैज्ञानिक खेळण्याची रचना करण्यात जास्त रमतात. अगदी छोट्या छोट्या प्रयोगातून विज्ञानाचे तत्व सांगत मुलांमध्ये वैज्ञानिक दृष्टिकोन रुजवण्याच्या प्रयत्नात ते असतात.

प्रस्थापित व्यवस्थेतील अडी अडचणीवर मात करत अरविंद गुप्ता यांनी मुलांमध्ये वैज्ञानिक दृष्टीकोन रुजवण्याचे कार्य केले आहे. केवळ पोथीनिष्ठपणे वैज्ञानिक दृष्टीकोनाचे गोडवे न गाता डॉ. दाभोलकराप्रमाणे प्रत्यक्ष फील्डमध्ये उतरून त्यांनी काम केले आहे. त्यांच्या मते व्यवस्थेचा पाठलाग करत हुतात्मा होण्याची गरज नाही. आज गरज आहे ती स्वतः चांगले काम करण्याची. जेवढे लोक हे काम स्वतःचे म्हणून पुढे नेतील तेवढे चांगले. आज गरज आहे ती ज्ञान आणि विज्ञानाच्या संकल्पना अनकव्हर करण्याची. पुढच्या पिढीत ती रुजवण्याची.

*प्रश्नःआपण आयआयटी सारख्या संस्थेमधून शिक्षण घेऊनही इतराप्रमाणे अमेरिकेत जाऊन गले लठ्ठ पगार, इतर सोई सुविधा व ग्रीन कार्डधारक होत अमेरिकेत स्थाईक होण्याचा विचार न करता भारतातच राहून 'काही तरी करण्याचा' विचार कसा काय केलात? त्यामागील प्रेरणा कोणती?*

- सत्तरच्या दशकात मी आयआयटी कानपूर येथे शिकत होतो. तो काळ विलक्षण धुमश्चक्रीचा होता. संपूर्ण जग भांडवलशाहीच्या विळख्यात अडकलेले होते. जगभरातील युद्धविरोधी चळवळ, स्त्रियांची हक्कासाठी चळवळ, विद्यार्थ्यांचे बंड, कामगार चळवळ, वर्णद्वेषाविरुद्ध संघर्ष इत्यादीमुळे कॉलेजच्या कॅम्पसचे वातावरण ढवळून निघाले नसेल तर नवल म्हणावे लागेल. मलासुद्धा या संघर्षांचे झळ नक्कीच पोचले होते. परंतु *लोकाबरोबर रहा, त्यांच्यावर प्रेम करा* या माझी आईच्या, रामदुलारीच्या बालपणीच्या शिकवणीचा अगदी लहानपणापासूनच परिणाम झालेला असल्यामुळे मी त्याकाळीसुद्धा अगदी वेगळा विचार केला. माझ्या काही समविचारी मित्रांच्या मदतीने कानपुरच्या परिसरात सहयोग या गटाची स्थापना केली. या गटातर्फे कानपुरच्या परिसरात गरीब कामगारांच्या मुलांसाठी एक शाळा सुरु केली. व शाळेत दर्जेदार शिक्षण देण्याचे प्रयत्न

केले. 8-10 मुलांची शाळा बघता बघता 300 मुलांची शाळा झाली. शाळेतील मुलांसाठी शालेय वस्तूंच्या खरेदीची सोय करताना या गटाला चित्र विचित्र अनुभवांचा सामना करावा लागला, चांगले वाईट अनुभव आले. या अनुभवांना खचून न जाता मी आणि माझे मित्र  काम करतच राहिलो. पाच वर्षाच्या कॉलेज शिक्षणाच्या या कालखंडाने मला भरपूर दिले. मला सामाजिक व राजकीय दृष्टिकोन दिला, माणूस म्हणून कसं जगायल हवं हा मार्गही दाखवला.

भारतातच राहून कार्य करायचे असे ठरविल्यानंतर आयआयटीचे बी. टेक. पदवी प्राप्त करून मी पुण्यातील टेल्को कंपनीत नोकरीला लागलो. टेल्को कंपनीत मी पाच वर्षे नोकरी केली. टेल्कोसारख्या नामांकित कंपनीतील चांगल्या पगाराच्या नोकरीमुळे माझे आयुष्य लौकिकदृष्ट्या खूपच सुरळित चालले होते. भौतिकदृष्ट्या माझे सुखी आयुष्य होतं. परंतु या भौतिक सुखात मी रमू शकलो नाही. माझं मन अस्वस्थ होतं. भोवतालचे अनेक प्रश्नं मला बेचैन करत होते. मुलांची उपासमार, आणि कुपोषण हे प्रचंड प्रमाणात होत असल्यास त्यांच्या मेंदूची वाढ होणार नाही, गरीबीमुळे येणारी अंधश्रद्धा, निरक्षरता आणि आर्थिक, सामाजिक व सांस्कृतिक मागासलेपण हे भीषण स्वरूपात मुलांच्या समोर उभे राहतात, या जाणिवा मला स्वस्थ बसू देईनात. अंधारात मी चाचपडत होतो. काही दिशा मिळत नव्हती. परंतु काही तरी करावे यासाठी मन उत्सुक होते. त्याच कालावधीत शाळेतील मुलांसाठी काम करत असलेल्या होशंगाबाद येथील किशोर भारती या संस्थेबद्दलची माहिती माझ्या वाचनात आली व एके दिवशी तेथे प्रत्यक्षपणे जाऊन तेथील कामाचे स्वरूप जाणून घेण्याचा मी निर्णय घेतला.

नोकरी करत असताना काही दिवसासाठी बिनपगारी रजा घेऊन होशंगाबाद येथील किशोर भारती या स्वयंसेवी संस्थेला मी भेट दिली. ही

संस्था त्या परिसरातील शाळेत काही शिक्षणविषयक प्रयोग करत होती. त्याच काळी छत्तीसगड येथील मजदूर आंदोलनाचे व विज्ञानाचे अभ्यासक डॉ. अनिल सद्गोपाल, यांच्याशी संवाद साधण्याची, त्यांचे काम बघण्याची संधी मला मिळाली. या किशार भारतीने  मला एका शाळेत विज्ञान व गणित शिकवण्याची संधी दिली. मानधन, प्रवास खर्च इत्यादींचा कुठलाही विचार माझ्या डोक्यात आला नाही.  मी पटकन होकार दिला. सोई सुविधांचा अभाव असलेले ते एक खेडे होते.  परंतु मुलांनी शिकले पाहिजे ही जिद्द माझ्या मनात होती. मी तेथे शिकवू लागलो. विज्ञान कसे शिकवू नये अशी स्थिती त्या शाळेत व भोवतालच्या बहुतेक शाळेत होती.

प्रयोग म्हणून विज्ञानाची खेळणी बनवण्याचे काम करत विज्ञानाची गोडी निर्माण करण्याच्या प्रयत्नात किशोर भारती होती. मी स्वतः इंजिनियर असल्यामुळे खेळण्यांची रचना कशी असावी याबद्दलचे माझे काही आडाखे होते.   त्या दिवसापासून किशोर भारती या संस्थेशी मी जोडलो गेलो. टाकावू वस्तूतून स्वस्तातील वैज्ञानिक खेळणी कशी बनवावीत हा विचार माझ्या डोक्यात घुमत होता. त्या खेड्यातील आठवड्याच्या बाजारात एकदा फिरत फिरत जात असताना 1-2 फूट सायकलीची व्हाल्व ट्यूब व काडीपेटींची खरेदी मी केली. त्यातून त्रिकोन, चौकोन, प्रिज्म, पिरॅमिडसारखे भूमितिय रचना करता येतात याचा जणू मला ‘साक्षात्कार’ झाला. *युरेका युरेका* म्हणून पळण्याचे तेवढे राहून गेले. विज्ञानाचा वास्तविक जीवनाशी संबंध जोडता येतो याची जाण मला आली. बघता बघता साधी  काडीपोटी, त्यातील काड्या व शर्टला लावण्याचे बटन्स या मधून मॅकेनोचा जन्म झाला. इतरही काही खेळणीसंबंधी मी प्रयोग करू लागलो.

*प्रश्नः किशोर भारतीतून तुम्ही त्रिवेंद्रमला कसे काय पोचलात?*

- मी शिकत असतानाच लॉरी बेकर या सिव्हिल इंजिनियरने मला भुरळ घातली. त्यांनी भारतात केलेल्या कामांचे मला आकर्षण होते. इंग्लंडमध्ये जन्मलेले परंतु भारतीय नागरिकत्व पत्करलेले लॉरी बेकर गांधीजीच्या संपर्कात आले होते. गांधीजींच्या विचाराने प्रभावित होऊन ते भारतात राहिले. स्थानिक वस्तू वापरून स्वस्त दरात घरं बांधली गेली पाहिजेत असे त्यांना वाटत होते. मुळातले सिव्हिल इंजिनियर असलेले लॉरी बेकर ग्रेट वास्तु विशारद होते. ते कर्नाटक व केरळ येथे इमारती बांधण्यासंबंधी सल्ला देत असत. काही ठिकाणी तर एखाद्या गवंड्यासारखे काम केले व त्यासाठी गवंड्याइतकीच मजूरी घेतली. एका तऱ्हेने लॉरी बेकर यांनी गरीबांच्या आयुष्याला स्पर्ष केला होता. अशा पर्यावरणवादी, मानवतावादी व साध्या माणसाचा प्रभाव माझ्यावर पडला होता. रजेतील काही काळ त्रिवेंद्रम येथील लॉरी बेकर यांच्या बरोबर घालवावे, त्यांना भेटावे असे मला तीव्रतेने वाटत होते. मग मी तडक त्रिवेंद्रमला पोचलो. लॉरी बेकरची भेट झाली. त्याच वेळी त्रिवेंद्रमच्या वास्तव्यात केरळ शास्त्र व साहित्य परिषदेच्या कृष्णकुमार यांच्याशी काही निमित्ताने माझी भेट झाली. किशोर भारतीमध्ये खेळणीसंबंधीचे मी काम केल्याचे त्यांना समजले. माझ्यासाठी त्यांनी काही साहित्य मागवून दिल्यानंतर मी बघता बघता त्या वस्तूतून भूमितिय आकार करून दाखवले. त्या रचना बघून कृष्णकुमार यांना आश्चर्याचा धक्का बसला. त्यांनी त्रिवेंद्रममध्ये माझ्यासाठी आणखी काही कार्यक्रमांचे आयोजन केले.

*तुमच्या टेल्कोतील नोकरीचे काय झाले?*

- सर्व घडामोडीतून जात असताना मला सकाळी 10 ते दुपारचे 5 पर्यंतची नोकरी कराविशी वाटेना. वैयक्तिक खर्च कमी करून थोड्या पैशात जीवन जगता येते याचा प्रत्यय त्रिवेंद्रमच्या मुक्कामी मला आला होता. त्यामुळे टेल्कोची नोकरी सोडण्याचा निर्णय मी घेतला. 1981च्या सुमारास

गुरुतुल्य असलेल्या माझ्या आईचे अल्पशा आजारपणामुळे निधन झाले. इतर कुटुंबियाच्या आग्रहाखातर मी लग्न करण्याचा निर्णय घेतला. परंतु माझ्यासारख्या भणंग माणसाला मुलगी देणार कोण? त्यामुळे माझ्या कुटुंबियानी वृत्तपत्रात जाहिरात देण्याचे ठरवले. "मुलगा – आयआयटी कानपूरचा इंजिनियर, पाच वर्षे टेल्कोत काम केले असून सध्या ट्रेड युनियनची काम करतो. घटस्फोटित, विधवा, मुल असलेली, नसलेली मुलगी चालेल. जात आणि वय याची अट नाही. हुंडा नको" अशी ती जाहिरात होती. ही विक्षिप्त जाहिरात वाचून सुनीता पंधे ही तरुणी मला भेटण्यासाठी दली राजरा येथे आली. माझ्या कामगाराबद्दलची तळमळ बघून भारावून गेली. माझे कष्टमय जीवन जवळून पाहिले. व तिने लग्न करण्याचा निर्णय घेतला. आर्यपद्धतीने आम्हा दोघांचे लग्न झाले. पुण्यातली नोकरी सोडून सुनीता माझ्यासोबत त्या खेड्यातील एका शाळेत शिकवू लागली.

*प्रश्नः पुण्याला परत कधी आलात?*

- 1984मध्ये मी व सुनीता पुण्याला परतलो. याच दरम्यान आम्हाला एक मुलगी झाली. माझ्या आईची आठवण म्हणून आम्ही मुलीचे नाव दुलारी म्हणून ठेवले. दुलारी लहान असताना मी तिच्याबरोबर अनेक विषयावर बोलत होतो. पुस्तकं वाचून दाखवत होतो. हिंदी भाषेतील हरी मोहन झा यांचे *खट्टर काका* या पुस्तकातील काही पानं वाचल्याशिवाय दुलारी झोपत नसे. मी तिच्यासाठी खूप खेळणी आणत असे, पुस्तकं आणत असे. मुळात माझ्या मोकळ्या स्वभावामुळे मुलांशी माझी फार पटकन नाळ जुळते.

*प्रश्नः आयुकातील विज्ञान केंद्राशी तुम्ही कसे काय जोडला गेलात?*

- 2003साली डॉ. जयंत नारळीकर यांनी आयुकातील विज्ञानविषयक केंद्रात काम करण्याच्या बाबतीत मला पाचारण केले. सरकारी संस्थामध्ये काम करणे जिकिरीचे असले तरी व नियमांना बांधून घेण्याची तयारी नसली

तरी मी आयुकाच्या मुक्तांगण विज्ञान शोधिकेचे काम स्वीकारले. नाही जमल्यास तेथून बाहेर पडू असे ठरवूनच मी होकार दिला होता. पुलंच्या 40 लाखाच्या देणगीतून साकार झालेल्या पुलस्त्य या इमारतीत या शोधिकेचे काम मी सुरु केले. डॉ. नारळीकरांच्या वैज्ञानिक संकल्पनांना प्रत्यक्षात उतरविण्याचे काम मी करू लागलो. काही काळानंतर या केंद्राचे नाव, महाराष्ट्रभर नव्हे तर देशाच्या पलीकडेसुद्धा प्रसिद्धीच्या झोतात आले. या केंद्रात श्रीमंतांच्या शाळांमधीलच नव्हे तर गरीब-झोपडपट्टीतील मुलांनासुद्धा मुक्त प्रवेश होता. ही मुलं या केंद्रात यावीत खेळणी हाताळावीत, खेळणी बनवावीत, त्यामागील विज्ञान समजावून घ्यावीत यासाठी मी विशेष प्रयत्न करत होतो. 400 चौ.फुटाच्या अरुंद जागेतील एका खोलीत तीन मोठ-मोठ्या टेबलावर इतस्ततः पसरलेली पुस्तकं, संगणक, अर्धवट वा तयार झालेल्या खेळण्यांची रास, कॅमेरा, झेरॉक्स मशीन, स्कॅनर्स हे माझ्या खोलीतील नेहमीचे दृष्य होते. केंद्राला भेट देणाऱ्या मुलांना (व इतरांनासुद्धा!) आपण एका वेगळ्या जगात प्रवेश करत आहोत की काय असे वाटे. याच जागेत रात्रंदिवस बसून मी स्वतः बनविलेल्या खेळण्याचे व्हिडिओ रेकॉर्डिंग केले. खेळणी कशी बनवावीत याची माहिती अस्खलित हिंदी व इंग्रजी भाषेत मी सांगत होतो. माझा मित्र परिवारही देश विदेशात पसरलेला होता. त्यामुळे माझे मित्र या खेळण्याची माहिती वेगवेगळ्या भाषेत रेकॉर्डिंग करून देत होते. कन्नड, मराठी, तेलुगु, तमिळ, मलयाळम, बंगाली, भोजपुरी, पंजाबी इत्यादी भारतीय भाषाबरोबरच स्पॅनिश, जर्मन, फ्रेंच, जपानीज इत्याही भाषेतूनही या खेळण्यांच्या व्हिडिओंची निर्मिती करण्यात आली. या खेळण्यांची माहिती सीडीतून उपलब्ध करून देण्यात आली. त्याबद्दलची पुस्तकं मी लिहिली यूट्यूबवरून हे व्हिडिओ प्रसारित करण्यात आले. या सर्व उपक्रमांना प्रचंड प्रमाणात प्रतिसाद मिळत गेला. ना नफा ना तोटा यातून खेळणीसाठी

लागणाऱ्या सामानांची, सीडी व पुस्तकांच्या विक्रीची व्यवस्था करण्यात मी पुढाकार घेतला. या दहा-बारा वर्षाच्या कालखंडात 20 भाषेमधील 8600 व्हिडिओ फिल्म्स यूट्यूबवर उपलब्ध केलेले असून सहा कोटीच्यावर प्रेक्षकानी त्याचा आनंद घेतला आहे. माझ्या या वैज्ञानिक शिक्षणाच्या उपक्रमाला आयुकाने सर्व सोई-सुविधा पुरवल्या. टाटा ट्रस्टने काही प्रमाणात निधी उपलब्ध करून दिली.

*प्रश्नः या वैज्ञानिक खेळणींच्या माध्यमातून विज्ञान प्रसाराचे काम कसे काय करू शकला?*

मुळात या खेळणींचा मोठ्या प्रमाणात प्रसार होण्यासाठी माझ्या या खेळणीबद्दलच्या पुस्तिकांचा फार मोठा वाटा आहे. मी लिहिलेले *खेल खेल में* या पुस्तकाच्या 100000पेक्षाही जास्त प्रती विकल्या गेल्या असतील. या पुस्तिकेचे 13 भाषेत अनुवाद झालेले आहेत. विज्ञानातील गोडी वाढवण्यासाठी मी लिहिलेली पुस्तकं सहाय्यकारी ठरले. पुस्तकांच्या लेखनाबरोबरच वैज्ञानिक खेळणीवर मी भरपूर प्रमाणात कार्यशाळा घेतल्या. शिबिरांचे आयोजन केले. मुलांमध्ये वैज्ञानिक दृष्टिकोन रुजवण्यासाठी, विज्ञानाबद्दल गोडी वाढवण्यासाठी मी सतत प्रयत्न करत होतो. विज्ञान विषयाचं प्रेम कुणाला किती आहे आणि कुणाच्या मनात काय निर्माण होईल याचा अंदाज कधीच येत नसतो. त्यामुळे मुलांमध्ये आवड निर्माण करणे, त्यांना उत्तेजन देत राहणे हाच त्यावर उपाय असतो. हा दृष्टिकोन पुढे ठेऊन मी आपल्या कार्यक्रमात, कार्यशाळेत वा शिबिरात जास्तीत जास्त मुलं सहभागी व्हावेत यावर विशेष लक्ष देत होतो. भारतातील सुमारे 3000 शाळांमधून मी व माझ्या सहकाऱ्यांनी मिळून कार्यशाळा घेतल्या असतील. या प्रकारच्या कार्यक्रमातून अनेक शिक्षकांना व विद्यार्थ्यांना मुलांसाठी, विज्ञान प्रसार करण्याची प्रेरणा मिळाली. सुमारे 25 देशामध्ये शिक्षक व विद्यार्थी या

उपक्रमांचा प्रसार करत आहेत. ही शिबिरं व कार्यशाळा म्हणजे विद्यार्थी व शिक्षकांना एक महोत्सव वाटत असे.  अत्यंत गोडीने, उत्साहाने सर्व जण सहभागी होत असतं. येथील शिक्षण  पाठ्यपुस्तकीय शिक्षण न राहता एक आनंद सोहळ्याचा भाग वाटू लागतो. खेळणी अद्भुत वाटू लागतात. शिक्षकही आश्चर्य चकित होतात. खेळण्यांचे प्रात्यक्षिक बघितलेले शिक्षक त्यानंतर खडू व फळा एवढीच शिकवण्याची साधनं न समजता, वापरून फेकून दिलेल्या प्लॅस्टिकच्या बाटल्या, रद्दी पेपर, लोहचुंबक, स्ट्रा, रिकामी पाकीटं, छोटे मोठे डबे, बाटल्यांचे बूच, रबर बँड, थर्मोकोल, तुटलेले चप्पल, इत्यादींचा वापर करून वैज्ञानिक प्रयोग करू लागतात. व त्यामागील सिद्धांत मुलांना समजाऊन देतात.

*खेल खेल में* या पुस्तकाला मिळालेल्या उदंड प्रतिसादामुळे प्रेरित होऊन मी विज्ञान सोपे करून सांगणारी अनेक पुस्तकं लिहिली. ही पुस्तकं सजवण्यासाठी अनेक कलाकारांची मी मदत घेतली. संगणकावरील कोरलड्रॉ वा फोटोशॉपवरील सॉफ्टवेअर वापरून अनेक उलट सुलट प्रयोग केले. पुस्तकांचे अनुवाद करण्यासाठी मित्रांना मी उत्तेजन दिले. पुस्तकं अनुवादित व्हावेत, कॉपी राइटच्या जंजाळात पुस्तक अडकू नयेत अशी माझी इच्छा आहे. आहेत. मी  स्वतः 350 हून जास्त पुस्तकाचे अनुवाद केलेले आहेत. नॅशनल बुक ट्रस्ट, एकलव्य प्रकाशन, केरळ शास्त्र साहित्य परिषद, NCERT, BGVS इत्यादी अनेक संस्थानी गुप्ता याच्या या उपक्रमांना विद्यार्थ्यांपर्यंत पोचवण्यात पुढाकार घेतला. याबद्दल मी त्याचा अत्यंत ऋणी आहे.

*प्रश्नः तुमच्या पुस्तकवेड्यापणाबद्दल भरपूर ऐकलेले आहे. त्याविषयी काही...*

- मला अगदी लहानपणापासून पुस्तक वाचण्याचे, पुस्तकं विकत घेण्याचे वेड होते. या वेडेपणामुळे माझा मित्रपरिवारही जगभर पसरलेला आहे. मला स्वतःला आवडलेल्या पुस्तकाविषयी कुठल्या तरी मित्राला सांगितल्याशिवाय मला चैन पडत नाही. चांगल्या पुस्तकाच्या काही प्रती घेऊन ते मित्रामध्ये मी वाटतही होतो. झेरॉक्स मशीन्स आल्यानंतर माझे आकाश ठेंगणे झाले असेल. कारण पुस्तकाच्या प्रती वाटणे सोपे झाले होते.

*प्रश्नः मी कुठेतरी वाचल्याचे स्मरते की या नंतरच्या पिढीला शिकण्यासाठी अरविंद गुप्ता यांचे संस्थळ व खान अकॅडेमीची गणितावरील संस्थळ पुरेसे ठरतील. तुमच्या या साइटमध्ये नेमके काय काय आहे?*

- मुलांचा विज्ञान विषयक दृष्टिकोन निकोप व्हावा, मुलांनी याविषयात उत्सुकता दाखवावी, स्वतंत्रपणे काही करावे व आतिशय माफक अशा साहित्यातून प्रयोगांची निर्मिती करावी म्हणून मी www.arvindguptatoys.com या वेबसाइटची निर्मिती केली. व माझी सर्व पुस्तकं या वेबसाइटवर फ्री डाऊनलोडसाठी उपलब्ध करून देली. या वेबसाइटवरच टॉयज फ्रॉम ट्रॅश या सदराखाली मी बनवलेल्या सर्व खेळणीबद्दलचे व्हिडिओ फिल्म्ससुद्धा अपलोड केलेले आहेत. त्याच बरोबर A Million Books for a Billion People या ब्रीदवाक्याला स्मरून डी. डी. कोसंबी, लॉरी बेकर, अनिल अग्रवाल, वसंत पळशीकर, आर ए जागीरदार, असिमोव्ह, मार्टिन गार्डनर इत्यादी लेखकांची पुस्तकं स्कॅन करून पीडीएफच्या स्वरूपात उपलब्ध करून दिलेली आहेत. गणित, रसायन शास्त्र, भौतिकी, खगोलशास्त्र इत्यादी अनेक विषयावरील पुस्तकंसुद्धा या वेबसाइटवर आहेत. इंग्रजी, हिंदी मराठी व इतर अनेक भाषेतील पुस्तकंसुद्धा येथे आहेत. ही पुस्तकं घरबसल्या वाचता येतात. पीडीएफ स्वरूपातील सुमारे 7700 पुस्तकांचा हा 'आभासी ग्रंथालया'चा ठेवा या साइटमध्ये

साकार झालेला आहे. TED या भाषणमालिकेतील मी केलेल्या प्रयोगाची ध्वनिमुद्रिकाही या साइटवर आहे.

*प्रश्नः आयुकातील विज्ञान केंद्रातून आपण कधी निवृत्त झाला व आता आपला कार्यक्रम कोणता?*

- 2013च्या सुमारास काही शारीरिक तक्रारीमुळे दवाखान्यात गेलेले असताना मला कॅन्सर झाल्याचे डॉक्टरानी निदान केले. हा कॅन्सर प्राथमिक अवस्थेत असल्यामुळे रेडिओथेरपीच्या काही सिटिंग्समधून उपचार करता येईल असे तज्ञांचे मत होते. याच काळात वेल्लोर हॉस्पिटलमध्ये माझी मुलगी, दुलारी वैद्यकीय शिक्षण पूर्ण करून एमडी करत होती. त्याच हॉस्पिटलमध्ये माझ्यावर रेडिओथेरपीचे उपचार करण्यात आले. सुमारे 40 सिटिंग्समध्ये कॅन्सर आटोक्यात आणण्यात डॉक्टर्स यशस्वी झाले. एका मायनर ऑपरेशनसाठी मला त्या हॉस्पिटलमध्ये 2 महिन्यासाठी वास्तव्य करावे लागले. या उपचाराच्या वेळीसुद्धा मी वेळ वाया न घालवता असिमोव्हच्या 11 पुस्तकांचे अनुवाद केले व वेळ सार्थकी लावली.

रेडिओथेरपी व इतर उपचारामुळे मी या आजारातून पूर्णपणे बरा झालो. व मी आयुकाच्या कामातून मुक्त होण्याचा निर्णय घेतला. निवृत्तीचा निर्णय घेत असतानाच मी पुढील कार्याची दिशा ठरवून टाकली. जग बदलू शकणाऱ्या 25 पुस्तकांची यादी त्यानी केली व त्यांचे हिंदीत भावानुवाद करण्याचे उद्दिष्ट समोर ठेवले. या पुस्तकांचे शब्दशः अनुवाद न करता पुस्तक वाचून त्यातील आशय समजून घेऊन 30-40 पानातून हिंदी लेखन करून वाचकांसमोर ठेवण्याचा माझा इरादा होता. त्यानुसार मी कामाला लागलो. भावानुवाद करताना कॉपी राइटचा प्रश्न नसल्यामुळे ही पुस्तकं आता वेबसाइटवर उपलब्ध आहेत. अगदी लहानपणापासून पुस्तकांचे वेड असल्यामुळे जगभरातील चांगली चांगली पुस्तकं शोधून त्यांचे स्कॅनिंग करून पीडीएफ

स्वरूपात उपलब्ध करून देण्याचे कामही मी करत असतो. ही पुस्तकं www.archive.org या साइटवर ते अपलोड करतो. जागतिक साहित्यात चित्रमय बालसाहित्याला एक वेगळे स्थान आहे. अशा साहित्यांचा शोध घेत त्यातील मूळ इंग्रजी भाषाऐवजी हिंदी भाषेचा साज चढवून ही पुस्तकं हिंदी भाषिक मुलांसाठी उपलब्ध करून देण्याच्या कामातही मी व्यस्त आहे.

*प्रश्नः तुमच्या विचारावर कुणा कुणाचा प्रभाव आहे?*

- माझ्या  जडण घडणीत अनेक मोठमोठ्या लोकांचा वाटा आहे. शंकर गुहा नियोगींच्या संघर्षात्मक कामात मी सहभागी होतो. आई रामदुलारी, शाळेतील मिसेस फ्रे ही शिक्षिका, डॉ. अनिल सद्गोपाल, प्रो. यशपाल, प्रो. कृष्णकुमार, जयंत नारळीकर, लीलाताई पाटील, डीडी कोसंबी, डॉ. नरेंद्र दाभोलकर, चिंचाळकर गुरूजी, यदुनाथ थत्ते इत्यादींच्या बरोबरील संवाद मला प्रेरणादायी ठरल्या. प्रो. यशपाल जेव्हा जेव्हा आयुकाच्या मुक्कामी येत असत तेव्हा तेव्हा मी एखाद्या सावलीसारखे त्यांच्याबरोबर राहत होतो. यशपाल यांच्या दिल्ली येथील कार्यक्रमात मी व डॉ. दाभोलकर एकाच खोलीत वास्तव्यात होतो, आमच्या अनेक विषयावर गप्पा झाल्या, ही आठवण मी कधीच विसरू शकणार नाही.

●●●